Reviewed No 105 Rd on 24/5/89

( ३ ) ३०/३/१९६६

शेवटीं देखील रण धुमाळी माजणार । कलियुगांत हा यज्ञ सिद्धीस जाणें कठीण. यांत नानातऱ्हेचीं विघ्नें येतात. तेव्हां हा यज्ञ आपण करूं नये असें आपल्या सुमती प्रधानजींनीं सांगितलें असतां, महाराजांनीं तें न ऐकून हट्टास पेटून हा यज्ञ केला. त्याचा परिणाम लढाई, रक्ताच्या नद्या, वीरपतन द्वेष आणि शत्रु हा होणार.

सं०–हं: या तुमच्या नुसत्या कल्पना आहेत.

रावण०–आणि कांहीं दिवसांनीं त्या खऱ्या झालेल्याही तुम्ही पहाल.

सं०–पण कांहो रावणसिंग, या समारंभाला भरत खंडांतील सर्व राजे लोक आले असून, फक्त समरसिंह रावळ चितोडकर आणि दिल्लीचे पृथ्वीराज हे दोघेच तेवढे कां बरें आले नाहीत. त्याना आमंत्रण नव्हतें कीं काय ? ते तर आगोदर आलें पाहिजेत. कारण आपल्या महाराजांचा आणि त्यांचा स्नेह संबंध असून आप्तपणाही आहे.

रावण–मी जें मघाशीं म्हटलें त्याचें बीज येथेंच आहे. या समारंभांत त्या उभयतांचा जो अपमान झाला, त्या योगानें आतां चव्हाण आणि राठोड विरांची गांठ समरांगणांतच पडणार. दैवगती ही दुसरें काय ?

सं०–याचें कारण–

रावण–पृथ्वीराज आणि रावळ न आल्यामुळें आपला फार अपमान झाला असें महाराजांस वाटून त्यांनीं पृथ्वीराजाची मूर्ती करून मंडपाच्या दाराशीं छडीदाराचें काम करण्याकरितां उभी केली. आणि रावळची प्रतिमा करून मुदपाकखान्यांत तिची स्थापना केली, आणि

त्या दोघांसही त्यांचीं यज्ञसमारंभांतलीं कामें करण्यास सत्वर हजर व्हावें असा पुन्हा दूताच्या हातीं निरोप पाठविला. अशा प्रकारचा आपमान त्या शूरांना कोठून सहन होणार. त्यांनीं लागलीच स्वारीची तयारी केली व ते लवकरच कनोजशहरावर येणार अशी बातमी आहे.

लं०-( आश्चर्यानें ) खरें कीं काय ? तुमच्या कल्पना इतक्या लवकर खऱ्या होतील असें मला वाटलें नव्हतें. पृथ्वीराज जर अशा रितीनें आपल्या अपमानाचा जाब घेण्याकरितां येत असेल तर, आपले महाराज कांहीं गप्प बसणार नाहींत.

रावण—छे, अशी गोष्ठ मुळींच होणार नाहीं. महाराजास ही बातमी कळल्याबरोबर त्यांनी पृथ्वीराजाशीं सामना करण्याकरितां वालुकरायांची योजना केली; आणि ते उदईक दहा हजार सैन्यानिशीं रवाना होणार.

लं०—असें आहे तर महाराजानीं राजकन्येच्या स्वयवराची इतकी घाई कां केली ?

रावण—या समारंभांत तोही समारंभ उरकून घ्यावा, असा महाराजांचा हेतू आहे आणखी राजकन्याही उपवर झाली आहे.

लं०—हा स्वंयवर समारंभ लवकरच आटोपला पाहिजे. न जाणो एखादी बरी वाईट गोष्ट झाली तर ते एक विघ्न म्हणायचें. पण काय हो, प्रथम तर ते परमार वंशातील आपल्याला शूर, सुंदर, असे म्हणविणारे कहर कंठीर वीर यांनाच राजकन्या देण्याचा महाराजांचा विचार होताना; मग हें फसलें कसलें ? महाराजांची तर त्यांच्यावर अत्यंत मर्जी.

**रावण**—अद्यापि देखील आहे; आणि त्यांनाच राजकन्या द्यावी असा त्यांचा अजून हेतू आहे; पण—

**लं०**—पण म्हणून थांबलांत का? बोला. एखादी अत्यंत गुप्त गोष्ट असली तर ती मजकडून बाहेर फुटेल अशी शंका बिलकूल धरूं नका. राणीसाहेबांना जामात पसंत नाहींत कीं राजकन्येला हे पतिराज आवडत नाहींत. दोहोंतून एक कांहीं तरी असलें पाहिजे.

**रावण**—तुम्हाला आपल्या महाराजांचा हेकेखोर आणि तापट स्वाभाव माहीत आहेच; तेव्हां त्यांच्यापुढें राणीसाहेबांच्या पसंती नापसंतीला कोण विचारतो. संयोगिता ताईसाहेबांकडूनच नकार आहे; आणि हें महाराजांच्या कानांवर गेल्यामुळें त्यांनीं स्वयंवराचा बेत केला. अशांतूनही राजकन्येनें जर कहरकंठीरास वरलें तर महाराजास अत्यानंद होईल. शिवाय त्यांचें मन वळावें म्हणून महाराजांचें आणि त्या वीरमणीचें सारखे प्रयत्न चालू आहेत.

**लं०**—राजकन्येनें कहरकंठीरासच वरावें असा तर महाराजांचा आग्रह आहे, तर त्यांनीं त्याच्या अंगचें असें काय मोठे अवर्णनीय गुण पाहिले? राजकन्या जर त्याचा अव्हेर करीत असली, तर ती यांत मोठी चूक करते असें मी कधींही म्हणणार नाहीं. या तिच्या चातुर्याबद्दल जन तारिफच करील. भल्या गृहस्थाला सहज बोलण्याच्यावेळीं देखील कोण त्रास पडतो.

**रावण**—परमार सारख्या मोठ्या कुलांत जन्म, मोहब्याच्या लढाईत पृथ्वीराजानें पराभव केल्यामुळें त्यांची निंदा करण्यांत कुशलता, आत्मस्तुतिप्रियता, सज्जनांचा द्वेष,

गरिबांवर वक्रदृष्टी, आणि कोरड्या शौर्याची ऐट इतके गुण असल्यावर आणखी काय पाहिजे. आपल्याला राजकंन्या मिळणार एवढयावरून ही स्वारी फारच चढून गेली आहे. त्यांना आतांच आपण महाराजांचे जामात झालों असें वाटायला लागलें आहे आणि त्या प्रमाणें ते आपल्या बोलण्यांत आणि कृतींत स्पष्ट करून दाखवितात.

लं०—महाराजांचा तसा हेतू आणि राजकंन्येचा असा हेतू तेव्हां हें जमणार कसें? राजकंन्येच्या मनांत तरी कोणाला वरावयाचें आहे. त्याबद्दल कांहीं कळलें का?

रावण०—त्याचीही मला बारिक रितीनें बातमी लागली आहे.

लं०—तर मग सांगा पाहूं, कोणा भाग्यवानाचें या अलौकिक राजकन्येच्या पाणिग्रहणानें भाग्य उदयाला येणार तें!

रावण०—लंगरीराय, ती गुप्त गोष्ट मी तुम्हाला सांगतों; पण त्यापैकीं एक अक्षर देखील दुसऱ्या कोणापाशीं बोलणार नाहीं अशाबद्दल तुम्ही शपथ घेतली पाहिजे. यामुळें माझा तुमच्यावर विश्वास नाहीं असें मात्र तुम्ही समजूं नका. या पैकीं एक अक्षर जर आतां बाहेर फुटलें तर राजकुटुंबांत काय गोंधळ उडून जाईल आणि त्याचा काय परिणाम होईल, हें मला सांगतां येत नाहीं; म्हणून मला इतकी खबरदारी घ्यावी लागते, याबद्दल तुम्ही मला क्षमा करा.

लं०—( तरवारीवर हात ठेवून ) या माझ्या तरवारीची आणि आपल्या गळ्याची शपथ घेऊन सांगतों कीं, आपण जें सांगाल त्यापैकीं एक अक्षर देखील बाहेर फुटणार नाहीं.

वण०–( इकडे तिकडे पाहून हलकेच ) हें पहा; राजकन्या संयोगितेचें मन पृथ्वीराजावर जडलें आहे. दिल्लीपतिशिवाय दुसऱ्या कोणाला वरायचें नाहीं असा तिचा अगदीं दृढनिश्चय आहे. आपले महाराज आणि पृथ्वीराज जरी अगदीं जवळचे आप्त आहेत तरी, त्यांचा आतां आप्तपणा आणि प्रेम नाहींसें होऊन त्या ठिकाणीं वैरानें आपलें ठाणें कायमचें बसविलें आहे. स्नेहधर्मानें उभयतांची भेट आतां या जगांत मुळींच होणार नाहीं. जेव्हां जेव्हां या दोनां वीरश्रेष्ठांच्या गांठी पडण्याचा समय येईल, तेव्हां तेव्हां ते तरवारी उपसून समरांगणांतच पडतील. अशी स्थिती असतांना राजकन्येचें मन पृथ्वीराजावर आहे असें आपल्या महाराजांस कळल्यास काय अनर्थ होईल याची कल्पना आतां तुह्मीच करा. कसला यज्ञ, कसलें स्वंयवर आणि कसलें काय ! राज्यावर मोठें संकट आहे. पहावें आतां काय होतें तें ?

ंं०–( आश्चर्य चकित होऊन ) असें काय ? दिल्लीपतीचें आणि आपल्या जयचंद महाराजांचें सख्य असावें असें मलाच काय पण आपल्या राज्यांतील प्रत्येक मनुष्याला वाटत आहे; कारण त्यांचे आपल्या सर्व प्रजाजनांवर तसेच अगणीत उपकार आहेत. महंमद शहाबुद्दिन गोरी ज्या वेळेस हिंदुधर्म बुडविण्याच्या उद्देशानें कनोज शहरावर चालून आला होता, त्यावेळेस हिंदुधर्माचा अभिमान धरून आपलें स्नेहाचें आणि आप्तपणाचें नातें मनांत वागवून जर पृथ्वीराज आपल्या सहायास न येते, तर यावेळपर्यंत हिंदुधर्म लयास जाऊन जिकडे

तिकडे महंमदी होऊन शेंडी बदल दाढी दृष्टीस पडली असती; आणि देवळाच्या मशिदी होऊन चहूंकडे भजन पूजनाच्या ऐवजी “ अल्लाहा अक्बर ” असे ध्वनी या कनोज शहरांत ऐकूं आले असते. या त्यांच्या उपकाराबद्दल राजकन्या संयोगिता त्यांस अर्पण करून त्यांचा सन्मान करावा आणि पूर्वीचा स्नेह संबंध जास्त दृढ करावा हेंच आमच्या महाराजांस भूषण. असें असून त्यांचा या यज्ञ समारंभांत असा अपमान करणें, आणि परस्परांनीं परस्परांचा द्वेष संपादणें हें मोठें चमत्कारिक नव्हे काय ?

रावण–पण या गोष्टी बोलाव्या कोणी ? जो त्यांच्या संबंधानें; गोष्ट काढील त्यानें आपलें शीर देण्यास आधीं तयार असले पाहिजे लंगरीराय, मी तुम्हाला खात्रीनें सांगतों कीं, आपल्या महाराजांच्या मनांत पृथ्वीराजाविषयीं बनून गेलेला द्वेष आणि राजकन्येची त्यांच्या ठिकाणीं असलेली अत्यंत प्रीति, या दोन अगदीं विरुद्ध गोष्टींचा परिणाम चांगला होणार नाहीं; आणि तो आपल्या सर्व राष्ट्रास चांगल्याच प्रकारानें भोगावा लागेल ! जाऊं द्या. या राजरहस्याच्या गोष्टींचा खल करून आपल्यास काय करायचे आहे. चला बोलण्याच्या भरांत बराच वेळ गेला. मला आतां तिकडे कामाला गेलें पाहिजे.

लं०-मीही आपल्या कामाला जातो. ( जरा इकडे तिकडे पाहून ) अहो, रावणसिंग ते पहा कहरकंठीर त्या लता मंडपाकडून मोठ्या झोंकानें, मिशांला पीळ घालीत इकडेच येत आहेत. स्वारी मोठी कुर्यांत आहेशी दिसते. आपण दोघे एके ठिकाणीं बोलत असलेले त्या शनीग्र-

हाच्या दृष्टीस पडणें यावेळीं इष्ट नहीं. नाहींतर भलतेच लचांड गळ्यांत यायचें.

रावण—हो खरेंच ! चला लवकर, आपण या इकडच्या रस्त्यानें जाऊं म्हणजे त्यांच्या दृष्टीस पडणार नाहीं. स्वारीची कमान सध्यां चढलेली आहे. म्हणावें, मोहोबाच्या लढाईत एक मिशी तर खालीं झालीच आहे. दैवयोगानें पुन्हा प्रसंग आला तर दुसरीही खालीं होईल. लंगरीराय शपथेची पूर्ण आठवण राहूं द्या.

लं०—त्या विषयीं तुम्ही निष्काळजी असा.

( दोघे जातात. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळ---राजा जयचंदाचाबाग.

( करहकंठीर प्रवेश करतो. )

करहकंठीर [ आपल्याशीं आणि मिशांवर तांव देत ] आतां मला आनंदगिरीच्या उंच शिखरावर बसून सौख्यातिशयाचा स्वच्छंदपणें उपभोग घेण्यास कायतो उद्यांचाच दिवस बाकी ! तो गेला ह्मणजे मग माझ्यासारखा सुखीप्राणी कोण आहे. परवा सूर्यनारायणाच्या उदयाबरोबर माझ्या भाग्याच्या उदयास आरंभ होणार ! तो परवाचा दिवस केव्हां उगवेल आणि स्वयंवर मंडपांत सर्व राजे लोकांसमक्ष राजकन्ये शेजारी मी केव्हां जा-

रून बसेन असें मला झालें आहे. तो परवाचा दिवस आजच उगवला असतां तर किती बरें चांगलें झालें असतें. परवाच काय अधिक आहे. त्या जोशाच्या बोलण्यावर विश्वास ठेवून उगीच हे दोन दिवस लांबविले यांत महाराजांचा शुद्ध वेडेपणा आहे. काय तर म्हणें परवांच्या दिवशीं मुहूर्त चांगला असून सुदीन आहे. ज्या दिवशीं वधुवरांचीं मनें एक होतात, तोच सुदीन आणि सुमुहूर्त. छे, या कामांत त्यांनीं मोठी मोठी चूक केली. जसें माझें मन यावेळीं माझ्या प्रियतमेचें आलिंगन सौख्य घेण्यास उतावीळ झालें आहे तसें तिचेंही झालें असेल; यांत बीलकूल शंका नाहीं. पण प्रीये, यांत माझा काय दोष ! हा सर्व दोष तुझ्या वडिलांचा तिलाही याबद्दल खास दुःख होत असेल; जेव्हां तिची माझी एकांतीं गांठ पडेल तेव्हां याबद्दल मी तिचें शांतवन करीन. आतां ती नटीक कुवर येऊन काय सांगतें तें पाहूं. याच ठिकाणीं भेटण्याचा तिनें संकेत केला होता. अद्याप कां बरें आली नाहीं. आपण या चवथऱ्यावर तिची वाट पाहत बसावें. [ बसतो. ] संयोगितेची अत्यंत प्रीतींतली दिल्लीची दासी तारा तिची महाराजांना सांगून दशा केली, त्यामुळें तिच्या बाकीच्या सर्व दासदासी कशा मला हात जोडून असतात; ती राजकन्येचें मन तिला नाहीं त्या गोष्टी सांगून बहकवीत असें. ही पोर कुवर तशी नाहीं, ती मला कधीं फसविणार नाहीं; आणि आज प्रियेनें मला फसविलें कीं, उद्यां तिला या कहरकंटीर कडून कंठस्नान मिळालेंच !

( इतक्यांत कुवर दासी येते )

कुवर- महाराज, मज गरिबावर इतका राग कां? आपण मला कंठस्नान घातलेत म्हणजे मग पुढचा महाराजांचा सोहळा आमच्या सारख्या अभागिणीला कशानें दृष्टीस पडणार. मी आपल्यापाशीं आतां चांगलें मोठें बक्षीस मागणार होतें, तें आपण मला हें बक्षीस देणार ना? आमचा गरिबांचा जीव कांहीं वर नाहीं आला. महाराज मला आपली कामगिरी नको आणि तें कंठस्नानाचेंही बक्षीस नको. ही मी जाते आपली—[ जाऊं लागते ]

कहर-[ घाईघाईनें उठून तिला आडवतो ] अग ए, तूं अशी रागावूं नकोस. तें मी आपला उगीच बोललों, ही मी तुझी त्याबद्दल क्षमा मागतों. तुला हात जोडतों [ तिला हात जोडतो ] पोरी अशी रागावतेस काय? बैस अशी. सांग बरें तूं तिकडे जाऊन माझ्या कामाचें काय केलेंस तें?

कुवर-( हांसून ) शेवटीं ही अशा रीतीनें लोकांची समजूत करायची, एवढी खुबी महाराजांना कशी छान साधली आहे. [ मनाशीं ] ताईसाहेबांचें हेतू पूर्ण होईपर्यंत यांच्याच मनाप्रमाणें बोललें पाहिजे. नाहींतर हा मूर्खशिरोमणी महाराजाना भलतेंच सांगून त्यांचा राग जास्त पेटवायचा! उद्यांचें संकट आजच कशाला मुद्दाम ओढून घ्या? ( उघड ) महाराज आपलें काम अगदीं फत्ते. आपल्यासारखे मोठे, कुलीन, शूर, रूपवान आणि गुणवान असे पति मिळणार कुठें. ताईसाहेबांचें मोठेंच भाग्य उदयाला आलें ह्मणायचें.

कहर-[ मानहालवून ] यांत काय संशय. यांत कायसंशय? होहो परमार कुळ कांहीं सामान्य नाहीं. राठोड,

चव्हाण, सोळंकी या सूर्यकुलापेक्षां फार उंच आणि फारफार मोठें आहे.

कुवर–पहिल्यानदां त्यांनीं नाक मुरडलें, पण मग त्या असामान्य कुळांत आपल्या सारख्याचें जन्म झालें आहे, असें जेव्हां ताईसाहेबांना कळलें, तेव्हां लागलीच त्यांची मुद्रा प्रसन्न झाली.

कहर–( हासून ) काय म्हणतेस ? बरें मग पुढें ? तूं माझें चरित्र-ही तिला सांगितलें असशील ?

कुवर–हो, तें त्यांनीं मोठ्या आनंदानें ऐकिलें आणि मग आपल्याबद्दल त्यांना मोठी धन्यता वाटली

कहर–सौंदर्याविषयीं सांगायला तूं विसरली नसशीलच. कारण अशा तरुण, सुंदर राजकन्यांना आपल्या अनुरूप आपल्याला पति मिळावा अशी मोठी हौस असते.

कुवर-वा महाराज तें मी कसें विसरेन! आपल्या सौंदर्याचें वर्णन त्यांनीं पूर्वीं बऱ्याच वेळां ऐकिलें होतें, कदाचित् त्यांनीं आपल्याला कधींकाळीं ओझरतें पाहिलेंही असेल. त्यांत आणखी मीं जेव्हां सर्व खुबीनें सांगितलें तेव्हां तर त्यांना आनंदाच्या सारख्या उकाळ्या येऊं लागल्या; आणि मग सहज बोलतां बोलतां "बाबानीं हें मला आधींच कां नाहीं सांगितलें, काय एवढी का मी भाग्यवान आहे ?" असें त्या मोठ्या प्रेमानें मजपाशीं म्हणाल्या.

कहर–( आनंदानें ) वा, येथपर्यंत काम झालें ना ! तूं खूप कामगिरी बजावलीस. आतां तर शंका मुळींच राहिली नाहीं.

कुवर–महाराज काय सांगूं आपल्याला; ज्या वेळीं मी आपलें पराक्रम आणि गुण त्यांच्या जवळ वर्णन केले, त्या वेळीं

त्यांना इतका आनंद झाला कीं, त्यांनीं लागलींच माझ्या गळ्यांत मिठी मारली, आणि त्या आनंदाची खूण म्हणून आपल्या गळ्यांतून हा मोत्याचा हार काढून माझ्या गळ्यांत घातला. ( त्याला हार दाखविते. )

कहर–या मोत्यांचें पाणी मोठें छान आहे. बरें माझ्या कडून हें घें तुला सध्याच्या कामगिरी बद्दल बक्षिस ! [ असें ह्मणून शेला तिच्या अंगावर घालतो. ] हा तुला चांगला शोभतो. आतां तूं पूर्वींपेक्षांही गोड दिसूं लागलीस.

कुवर–महाराज ताईसाहेबांचे आपल्यावर इतकें मन बसलें आहे कीं, आपल्या रूपाचें चिंतन, आणि आपल्या गुणाचें मनन, या शिवाय त्यांना आतां दुसरें कांहीं सुचत नाहीं. त्यांची वृत्ती त्यावेळेपासून कांहीं चमत्कारिकच झाली आहे. त्यांना परवाचा दिवस केव्हां उजाडेल असें झालें आहे.

कहर–असें हें व्हावयाचेंच ! मला देखील तसेंच झालें आहे. परवाच्या दिवशीं मग खूपच मजा उडेल.

कुवर–कशीं पण; सर्व राजमंडळ आपल्या भाग्योदयानें अगदीं थक्क होऊन जाईल.

कहर–त्या सर्वांना मी मोठमोठ्या लढायांत गाजविलेलें शौर्य माहित आहे. एवढा पराक्रमी पृथ्वीराजना त्याला देखील मोहोब्याच्या लढाईत या वीरानें दोन हात चांगले दाखविले आहेत.

कुवर–[ इकडे तिकडे पाहून घाबरेपणानें ]अग बाई, महाराज त्या पहा ताईसाहेब त्या पलिकडल्या वेली खालून हलके हलके येत आहेत. आपल्याच मनाशीं विचार करण्यांत

त्या अगदीं गुंग होऊन गेल्या आहेत. व आपल्याशींच कांहीं गुणगुणत आहेत.

( इतक्यांत संयोगिता आपल्यामनाशीं गाणें म्हणत हलके हलके दुसऱ्या बाजूनें येते. दोघे जरा एका बाजूला होतात. )

ोगिता-[ आपल्याशीं ] गाणें [ श्रीरंग, गोपिका संग, करु. नि दंग. या चालीवर ] वल्लभा —

मतत्प्राण । तुझीरे आण । गुंतले जाण ॥ प्रिया, तव चरणीं ॥
कधिं होइन धन्य तुला पाहूनी ॥ तुला पाहूनी ॥ १ ॥
प्रियकरा । सुगुण मंदिरा । रूप सुंदरा ॥ ताप शमवूनी ॥
सुखवि झणीरे आलिंगन देऊनी ॥ २ ॥

र-[ कहर कंठीरास ह्मणते ] महाराज झालीना आतां खात्री, असें हें तुमच्या विषयीं नेहमीं चाललें असतें. ताईसाहबे तुम्हालाच खास वरतील.

र--अहाहा, धन्य आहे मी !

र-महाराज, ताईसाहेबांनीं जर आपणा उभयतांस एकांत जागीं पाहिलें तर त्या मजवर रागावतील, करितां आपण त्यांच्या दृष्टीस या वेळीं मुळीं पडूं नका. असेच इकडून परभारें गुपचिप जा.

र-पण आतांच तिला भेटलों तर काय हरकत आहे.

र-छे, अशी घाई करूं नका; मग सर्व मसलत फसेल. आणि तुमच्याकडे असभ्यतेचा दोष येईल. परवा त्या तुमच्याच आहेत. जा लवकर. त्या पहा आतां अगदींच जवळ आल्या.

र-बरें तसें कां होईना. [ जातां जातां ] ती काय म्हणाली. रूप सुंदरा । सुगुण मंदिरा । ती अगदीं खरें बोलली. आतां ती माझी झालीच. [ जातो. ]

कुवर–[ गेलासें पाहून ] जा, खा मनांत हवे तितके मांडे. या कावळ्याला का ही राजहंसी मिळणार ?

संयो०– [ गाणें म्हणतें ] मत्तात । करी मम घात । खचित–

कुवर–( पुढें होऊन ) ताइ साहेब, आपण हें काय बोलता. गैरसावधपणानें केलेलें काम फसतें ! आपला हेतू शेवटास जाईपर्यंत आपल्याला फार सावधपणानें वागलें पाहिजे. हे आपले शेवटचे शब्द जर त्या कहर कंठीराच्या कानीं पडले, तर तो लागलेच हें सर्व महाराजांच्या कानावर घालील आणि भलताच अनर्थ होईल.

संयो०–ती साडेसाती येथेंही आली होती कां ?

कुवर–हो त्यानें मला मुद्दाम येथें येण्यास सांगिलें होतें, जर मी आलें नसतें तर तारेसारखी माझी स्थिति झाली असती.

यो०–तो मूर्ख काय करणार नाहीं ? बरें तो कायग म्हणत होता.

कुवर–ह्मणतो काय दुसरें ? नेहमींचें तेंच ! आपल्या तोंडचें शब्द ऐकून तो अगदीं हुराळला, मग त्या वेळेला त्याच्या मनासारखें बोलून त्याला तिकडे लावून दिला आणि आपल्याकडे आले. आज आणि उद्यां दोन दिवस वाट पहा, परवा तुम्हाला आपल्या मनाप्रमाणें वागण्याची पूर्ण मुखत्यारी आहे.

संयोगिता–गडे, इतक्या आम्ही भाग्याच्या कुठें आहोंत. खरें पुसशील तर तुम्हाला जितकी तुमच्या इच्छेप्रमाणें वागण्याची मोकळीक आहे तितकी देखील आम्हाला नाहीं. आम्हाला स्वतांला हात, पाय, डोळे, मन वगैरे कांहीं नाहीं. आम्हाला लोकांच्या डोळ्यांनीं पहायचें,

दुसऱ्याच्या कानांनीं ऐकायचें आणि तिसऱ्याच्या मनाप्रमाणें वागायचें. बाहेर दिसण्यांत मात्र मी राजकन्या असून सर्व ऐश्वर्याचा उपभोग घेत आहे, पण मनाची आंतली स्थिती काय आहे याचा अनुभव माझी मीच जाणें. तुह्माला तुमच्या मनाप्रमाणें वाटेल तेंव्हां आणि वाटेल तें करतां तरी येतें, आणि मला माझ्या बाबांच्या, आईच्या, फार तर काय पण तुमच्या दासीजनांच्या देखील मनाप्रमाणें वागावें लागतें. तेंव्हां माझ्यापेक्षां तुम्ही जास्त सुखी नव्हेत कां ! माझ्या मनाप्रमाणें एक तरी होतें कां ?

वर–जरा दमानें घ्याल तर सर्व कांहीं तुमच्या मनाप्रमाणें होईल.

यो०–तूं किनई माझी कशी तरी समजूत करतेस झालें ! असो नशिब माझें ! तारेनें त्यांचे एकेक गुण, पराक्रम सांगितले; त्या वेळेपासून माझें मन त्यांच्याच ठिकाणीं तल्लिन झालें आहे. त्यांच्या शिवाय दुसऱ्या कोणाला वरायचें नाहीं असा माझा दृढ निश्चय झाला आहे. बाबाला आणि आईला वाटेल तें करूं देत. या पायीं माझा प्राण गेला तरी हरकत नाहीं.

वर–ताईसाहेब, सध्यां तुम्हाला दैव जरा अनुकूल आहे असें समजा. आपण कहरकंठीरास वरावें असें दोन चार वेळ महाराजांनीं आपल्यास अत्याग्रहानें सांगितलें असतां, आपण नाकारल्यासारखें दाखविलें तेंव्हां महाराजांनीं हा स्वयंवराचा बेत केला;

यो०–आणि अद्यापपर्यंत तरी त्यांचा आग्रह कुठें सुटला आहे. रोज त्यांच्याकडून निरोप येतच आहेत.

**कुवर**–असें जरी आहे तरी स्वयंवर मंडपांत सर्वांसमक्ष तु-
म्हाला तुमच्या मनाप्रमाणें वागण्यास कांहीं एक हरकत
नाहीं; आणि तसें झालें म्हणजे महाराजांचेंही कांही
चालणार नाहीं. जर रागाच्या आवेशांत महाराजांनी
हट्टानें कहरकंठीर बरोबर आपलें लग्न लाविलें असतें,
तर आपण काय केलें असतें. तेव्हां स्वयंवर व्हावयाचें
ठरलें हें दैवयोगानें चांगलें झालें असें समजून यांत
आनंद माना आणि परवा आपलें कार्य साधा.

**संयो॰**–बाई, तूं म्हणतेस त्याप्रमाणें मी करीन, पण स्वारी
कुठें आली आहे. माझ्या सर्व आशा निर्फळ आहेत.

**कुवर**–उद्यांपर्यंत कदाचित् येईल.

**संयो॰**–छे आतां येणें मुळींच होणार नाहीं. बाबांनीं त्यांचा
थोडा का अपमान केला आहे ? प्रत्यक्ष त्यांची मूर्ति क-
रून यज्ञ मंडपाच्या द्वाराशीं छडीदाराच्या जागीं उभी
केली ! असा अपमान खऱ्या क्षत्रिय वीराला कसा स-
हन होईल? माझे बाबा पराक्रमानें, ऐश्वर्यानें आणि ब-
लानें मोठे असले म्हणून त्यांनीं लोकांचा अपमान काय
म्हणून करावा ? शिवाय काकाना सैन्य देऊन तिकडे
पाठविलें असें ऐकतें. तेव्हां यावेळपर्यंत मी जी मोठी
आशेची इमारत बांधिली होती ती आतां पार ढांसळली.
गडे, माझी कांहीं आतां धडगत दिसत नाहीं.

**कुवर**–मग मात्र अडचण खरी ! [ अंमळ विचार केल्यासारखें
करून ] ताईसाहेब, पृथ्वीराज स्वयंवराला जरी आले
नाहींत तरी तुम्हाला तुमचा हेतू शेवटास नेण्यास एक
युक्ती आहे.

**संयो॰**–[ उत्सुकतेनें ] सांग, सांग पाहूं. कोणची ती !

कुवर–मी सांगतें, पण ती आपण धैर्यानें तडीस नेली पाहिजे.

संयो०–फार काय सांगूं, त्यांच्या करितां माझे प्राण द्यायला मी तयार आहे.

कुवर–इतका तुमचा दृढ निश्चय असल्यावर मग काय पाहिजे ? [ इकडे तिकडे पाहून तिच्या कानांत सांगते. ] असें करा म्हणजे त्या मेल्या कहरकंठीराचे चांगले दांत पडतलि आणि महाराजांचेंही कांहीं चालणार नाहीं. आपल्या रजपूत जातींत मोठमोठ्या राजकन्यांचीं लग्नें कद्यारीशीं लागलेलीं आपल्याला नाहीं कां माहित, त्या पेक्षां हें सर्वोत्कृष्ट !

संयोगिता–( आलिंगन देऊन ) गडे तूं फारच चांगली युक्ती काढलीस.

कुवर–आणखी आपल्याला सांगून ठेवतें कीं, जरी महाराजांचें आणि दिल्लीपतीचें आतां अगदीं वाकडें आलें आहे तरी तुमचें निर्मळ प्रेम आपल्या ठिकाणीं पूर्ण आहे असें त्यानां कळलें कीं, मग ते हरतऱ्हेनें तुह्मांला दिल्लीस घेऊन गेल्याशिवाय राहणार नाहींत. खरोखर त्यांच्या सारखे उदार, शूर, असे तेच ! तारा ज्या गोष्टी सांगत असे त्या कांहीं खोट्या नाहींत. दिल्ली कडील जे जे लोक येतात, त्यांच्या त्यांच्या तोंडीं महाराजांच्या गुणवर्णनाशिवाय दुसरें कांहीं नसतें. त्या शिवाय आपल्या येथल्या लोकांना आणि महाराजांना त्या वीरमणीचे प्रताप माहित नाहींत काय ?

संयो०–आणि म्हणुनच हा प्राण त्यांच्या वरून ओंवाळून टाकावासा वाटतो. पण बाई, तें सर्व बाबांच्या रागिट आणि हट्टी स्वभावापुढें व्यर्थंग व्यर्थ. मग मी जे

म्हणते कीं, आम्हां स्वतांला म्हणून मन वगैरे कांहीं नाहीं, आम्हाला दुसऱ्याच्याच मर्जीप्रमाणें वागावें लागतें; तें खरें कीं खोटें. हें आतां तूंच पहा ह्मणजे झालें. त्यांचें दर्शन होई पर्यंत माझे दिवस कसें जातील तें जावोत. तारा असती तर त्यांच्या गोष्टी सांगून, त्यांचे पराक्रम ऐकून मला करमणूक तरी झाली असती आणि कदाचित् माझी स्थिती तरी त्यांना कळली असती; पण त्या बिचारीला देखील त्या मेल्या मूर्ख शिरोमणीनें बाबांना चहाड्या सांगून बंदिखान्यांत टाकलें. तेथें बिचारीची काय दशा होईल कोण जाणें ? जिकडे पहावें तिकडे मेली निराशाच दिसते.

कुवर–ताईसाहेब वारंवार त्या गोष्टी मनांत आणून उदासीन होऊं नका, धैर्यानें आपलें काम शेवटास नेण्याचा निश्चय केला कीं, परमेश्वर त्यांत यश देतो. चला ही पहा संध्याकाळ होऊन रात्र पडत चालली फार वेळ येथें राहणें चांगलें नाहीं.

संयो०–देव करो आणि तुझी वाणी सत्य होवो. ही संयोगिता तुझे उपकार कधींही विसरणार नाहीं बरें. चल बाई. तूं म्हणतेस तें कांहीं खोटें नाहीं. माझा निश्चय ढळूं देऊं नकोस.

( दोघी जातात, )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ-राजाजयचंदाच्या स्वयंवर मंडपांतील दरबार.

पात्रें- ( राजा जयचंद सिंहासनावर बसला आहे, दोहों बाजूनें सामंत, मांडलिक राजे, सरदार वगैरे बसले आहेत, द्वारापाशीं पृथ्वीराजाची मूर्ती हातांत छडी देऊन उभी केली आहे.

दुर्गाकेदार भाट--जयजयकार महाराज.

### सवाई.

यह संतति संपतिको लखिके, सुर लज्जित होत, हिये, आपनें ॥
अति आनंदसों दिनरैनसदा, बरकिन्नरानिर्मल कीर्ति भने ॥
तुवसिंहसमान पराक्रमको, जगनेशविलोकिन धीर ठनें ॥
रणशूर महाभट दिग्गजसे, बनजाय लुके हिय हारि मने ॥ १ ॥

दुसरा भाट—

### कवित.

उदित तिहारे होत कोविद सुसाधुगण, प्रफुलित कुमुदसे भये हैं अनंदसे ॥
प्रबल प्रचंड महिमंडलके बंड नृप, सकुचे सुकंजसे दिखात अति मंदसे ॥
रैयत नक्षत्रसब मुदित भई बिलोकि, कोक चोर जालिमको शोक प्रद फंदसे ॥
बीरचित नीरनिधिकाज महाराज आज, भासे जयचंद मोहि खासे नभ चंदसे ॥ २ ॥

दुर्गाकेदार—

कबित.

देखिके अखंड बल भूप महिमंडलके ॥
लुकतबितुंड ऐसे केहरी निहारिके ॥
आयसु सुशीस धरीदेत करभार तोहि ॥
रहत सभीत शत्रु खोफ उर धारिके ॥
राजसूय यज्ञादिक प्रगट सुयज्ञ करि ॥
कीने परि तोष देवि देवन सम्हारिके ॥
बैठ्यो जयचंद राज सभामें सराज युक्त ॥
मानो सब राज रत्न माल गल डारिके ॥ ३ ॥

( दोघां भाटास राजा जयचंद वस्त्रें दतो इतक्यांत चंदकवि सभेंतून उठून ह्मणतो. )

**चंदभाट**-या सर्व गोष्टी खऱ्या होतील, पण त्या सध्यां नाहींत. सध्यां तर—

कबित.

जीव बिन देह जैसे, मेह बिन बारिद ज्यौं ॥
नेह बिन मित्र जैसे, वस्त्र बिन कामिनी ॥
शूर हतियार बिन, धारबिन खड्ग जैसे ॥
तारबिन बीन जैसे, वर्षाबिन दामिनी ॥
मुख प्रिय बानी बिन, पानी बिन ताल जैसे ॥
जोर बिन ज्वानी जिम, फौज बिन छामिनी ॥
पृथ्विराज, रावळ, विहीन राज रत्न ऐसे ॥
जैसे दिन भानुबिन, चंद्रबिन यामिनी ॥ ४ ॥

**मतीप्रधान**–[रागानें] अरे मूर्खा, जरा जीभ संभाळून बोल ?

**जयचंद**-[ संतापानें लाल होऊन ] या सर्व राजसभेचा अशा रितीनें अपमान आणि उपमर्द करण्याबद्दल देहान्तच प्रायश्चित दिलें असतें, पण या मंगल कार्यांत तें अमंगल नको म्हणून मी तुला जिवंत सोडतों. अरे, या राज सभेंत त्या तुझ्या पृथ्वीराजाची [ मूर्तीकडे बोट दाखवून ] तीच योग्यता ! या राजसभेची सांप्रतची योग्यता देवादिकांनीं सुद्धां गावी.

**चंद**-[ मूर्तीकडे पाहून लवून मुजरा करतो ] देवादिक गाणार असले तर तेही नुसती त्यांची मूर्ती येथें आहे म्हणूनच गातील ! प्रत्यक्ष दिल्लीश्वर येथें असतां तर ह्या राज मंडळानें त्यांच्या चरणीं लोळण घेतलें असतें.

**जयचंद**-तुमच्या सारख्या भाटांना परमेश्वरानें दरिद्री ठेविलें आणि दारोदार भीक मागायला लावलें हें अगदीं बरोबर केलें.

**चंद**-राजा जयचंदा, आणि त्यानें आह्माला खरें आणि स्पष्ट बोल येण्याची देणगी दिली, हें त्याचें आमच्यावर केवढें उपकार ? आम्ही दरिद्री नाहीं. जो वाणीचा दरिद्री तोच मात्र खरा दरिद्री; त्या उदार शौर्यशाली दिल्लीपतीची योग्यता कशाला पाहिजे ? सूर्य कुठेंही असला तरी त्याचा प्रतापच त्रैलोक्याला त्याचें खरें महत्व कळवितो. त्या विमल भानूची निंदा करणाऱ्या खद्योताची मात्र जगाला खरी खरी योग्यता कळते.

**जयचंद**-[ संतापानें ] अरे मूर्खा, तुझ्या सारख्या एका देखील बैलाला, ज्या पृथ्वीराजाच्यानें यथास्थित खायाला घालून पुष्ट करविलें नाहीं आणि दारोदार तृणाकरितां हिंडायाला लाविलें, तेव्हां त्याचें औदार्य कितपत आहे

हें आतां दिसलेंच! या करितां, सुमती या बैलाला आपल्या किल्ल्यांत नेऊन ठेवून यथेश्च तृण खायाला घाला; म्हणजे हा चांगला धष्टपुष्ट होईल.

चंद–त्या महावीरानें समरांगणांत तुमचा पराभव केल्यामुळें, तुह्मा सर्वांना दातीं तृण धरायला लागल्यामुळें मला खायला तृण राहिलेंच नाहीं!

सुमती–( सेवकास ) अरे, या भाटाला घेऊन जाऊन महाराजांच्या आज्ञेप्रमाणें करा.

( सेवक चंदभटास पकडतात व बांधतात. )

चंदभाट–( रागानें ) राजा जयचंदा ऐक. माझा परम प्रियमित्र, महापराक्रमी, शूर, राजा पृथ्वीराज याच्या कडून तुम्हा सर्वांना समरांगणांत दातीं तृण धरायाला लावून, माझ्या गर्वमदानें केलेल्या अपमानाचें प्रायश्चित तुला भोगायला लावीन तरच मी नांवाचा चंदबरदाई.

( इतक्यांत संयोगिता हातांत माळ घेऊन कुवर दाससिह येते )

संयोगिता–( हलकेंच ) कुवर, तो पलिकडच्या बाजूला सेवकानीं बांधून उभा केला आहे तो कोणग ?

कूवर–तोच तो दिल्लीचा चंदबरदाई भाट! पृथ्वीराजाचा सभेंत अपमान झालेला पाहून तो भलभते बोलला म्हणून तो महाराजांच्या क्रोधास पात्र झाला आहे.

संयो०–[ दुःखित अंतःकरणानें ] गडे कसेंग होईल आतां! माझा उर धडधड उडूं लागला आहे.

कुवर ( हलकेंच ) मनाचा दृढनिश्चय ढळूं देऊं नका म्हणजे झालें.

( संयोगिता आलींसें पाहून )

जयचंद–बाळे, माझ्या निमंत्रणावरून भरतखंडांतील या सर्व राजे लोकांनीं, मोठमोठ्या पराक्रमी सरदारांनीं आणि सामंत मांडलिकांनीं येऊन ही माझी राजसभा सुशोभित केल्यामुळें मला मोठा आनंद होत आहे. तूंही उपवर झाल्यामुळें तुझा एखाद्या राजपुत्रा बरोबर विवाह लावून तो आनंदसोहळा मीं आपल्या डोळ्यांनीं पहावा, असा हेतू मनांत धरून तुझ्या स्वयंवराचा मीं हा समारंभ केला आहे. तर मुली या राजमंडळापैकीं, जो कोणी तुझ्या इच्छेस येईल त्याला वरून मला सर्व जगांत सुखी आणि धन्य कर म्हणजे झालें. सुमती, सर्व राजे लोकांची माहिती सांगा.

संयो०–बाबा, आपली आज्ञा मला शिरसामान्य आहे.

सुमती–बाईसाहेबांनीं असें इकडून यावें. [ कुवर आणि संयोगिता त्याच्या मागून जातात. ] हे पहा तुवर वंशातील राजे, हे पाटणचे चावडे वंशातील, त्याचप्रमाणें हे अजमीर येथील चव्हाण वंशांतील पराक्रमी राजे, हे मारवाडचे राजे, हे इकडे सामंत मांडलिक राजे बसले आहेत. हे महाराजापाशीं बसलेले परमार वंशांतील शूर सरदार कहरकंठीर, तसेच हे इकडे सोळांकी कुळांतील मोठमोठे सरदार बसले आहेत.

कहर–[ आनंदानें आपल्या मनाशीं ] झालेंच आतां !

संयो०–[ कहरकंठीराकडे नाक मुरडून ] कुवर, चल पुढें, बरं या राजमंडळाचे शेवटीं ही मूर्ती कोणाचीग !

कुवर–ताईसाहेब, ही मुर्ती दिल्लीचे अधिपती जे महापराक्रमी पृथ्वीराज त्यांची आहे.

संयो०–[ आपल्याशीं ] मना, तुझ्या दृढ निश्चयाची परिक्षा

आतांच आहे. [ उघड ] असें काय ? तर याच वीर पुरुषाला मीं अंतःकरणपूर्वक वरिलें आहे. [ मूर्तीला माळ घालू लागते ] [ सर्व सभा चकित् होते, राजा जयचंद रागानें सिंहासनावरुन उठतो ].

**जय०**—[ रागानें ] हां, हां, बाळे संयोगिते, हें काय करतेस ?

**संयो०**—बाबा, आपल्या वडिलांच्या आज्ञेप्रमाणें आणि माझ्या मनांतील हेतूप्रमाणें याच वीराला मीं आपला देह अर्पण केला. [ मूर्तीला माळ घालते ].

**जयचंद**-[ रागानें ] संयोगिते, तूं शुद्धीवर आहेसना ? हें स्वयंवर आहे कीं पोरखेळ आहे. हें सर्व राजमंडळ त्या नीचाच्या धातू मूर्तीपेक्षां कांहीं कमी योग्यतेचें आहे असें समजतेस काय ?

**संयोगिता**—बाबा तसें नव्हे.

**जयचंद**—तर या धातूच्या पुतळ्याला माळ घालून तुझी आणि माझी सर्व जगांत अपकीर्ति होईल, सर्वजण उपहास करतील, असें का करतेस ? याचा कांहीं विचार कर; असा वेडेपणा करूं नकोस ?

**संयोगिता**—सर्व जगभर ज्यांच्या शौर्याचा डंका गाजतो आहे, ज्यांचें गुणानुवाद सर्व अबालवृद्ध गातात, ज्यांच्या चरणीं माझें मन तल्लिन झालें; त्यांना मी मनोभावानें वरिलें, यांत मीं काय अपराध केला.

**जयचंद**—जशी ही मूर्ति जड, आणि हिच्या अंगीं स्वताचे कांहींएक गुण नाहींत, तसाच तो पृथ्वीराज उद्धट आणि जड बुद्धीचा आहे. आज जे येथें सर्व राजे सरदारलोक बसले आहेत, त्यांपैकीं साधारण सरदारांच्याहीं अंगीं जें शौर्य असेल तें त्याच्या अंगीं नाहीं. या

जयचंदाच्या दरबारीं त्या मतिमंदाची हेंच काम करण्याची योग्यता! राजा जयचंदाच्या मुलीनें छडीदाराच्या मूर्तीला वरिलें असा दुर्लौकिक करून जगांत उभयतांचें हांसें कां करून घेतेस? तूं एखाद्या सरदाराला जरी वरिलेंस तरी त्याला मी आपल्या बरोबरीचा राजा करून सोडीन, त्याला तुझ्या करितां ऐश्वर्याच्या शिखरावर नेऊन बसवीन, या सर्व राजेलोकांना त्याच्या पाया पडायाला लावीन, त्याच्या करितां आणि तुझ्या करितां मी हवें तें करीन, रंकाचा राव आणि रावाचा रंक करण्याचें आज या जयचंदाच्या अंगांत सामर्थ्य आहे. तो पहा, कहरकंठीर जरी माझ्या सरदारांपैकीं एक लहानसा सरदार आहे, तरी तो रूपानें आणि शौर्यानें सामान्य नाहीं.

**संयोगिता** [ नाक मुरडून ] इतकें करायला जर आपण तयार आहांत तर मग याच मूर्तीला तसें करा म्हणजे झालें. यांत आपला मोठेपणा सर्व जगाला कळेल.

**जयचंद**—तुला वेड लागलें आहे, मी सांगतो तें ऐक. उगीच आपलाच हट्ट चालविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुला आपलें कुल, शील, कीर्ति, अपकीर्ति, बरें वाईट सर्व कांहीं कळतें. तूं कांहीं आतां अज्ञान नाहींस. यांतून एखाद्या राजाला किंवा राजपुत्राला वर. हा असला वेडेपणा करून माझा राग दुणावूं नकोस.

**संयोगिता**—बाबा, स्वयंवर एकदां होतें. ज्यांना मी एकदां माळ घातली, ती परत दुसऱ्याला कशी घालूं? त्यांच्या ठिकाणीं माझें मन बसल्यानें मी आतां माझी स्वतांची देखील राहिलें नाहीं. यापुढें या देहावर माझ्या प्राणावर

त्यांची सत्ता, तेच स्वामी. आपल्याला राग यावा, आपली अवज्ञा, आपला उपहास व्हावा अशी गोष्ट मीं केली नाहीं. मीं जें केलें आहे तें सर्व देवांना स्मरून आपल्या कुलशीलाचा आणि बऱ्यावाईटाचा विचार करून आपल्याच आज्ञेप्रमाणें केलें आहे. आपल्या रागाला भिऊन जर मी आतां असें करीन तर मग सर्व जग आणि माझें मन तरी मला काय म्हणेल ?

**जयचंद**–सार्वभौम राजा जयचंदाच्या पोरटीनें माझ्या हाड-वैऱ्याच्या धातूमूर्तीलाच वरलें, ही जी सर्व जगभर माझी दुष्कीर्ति होईल ती तुला पतकरते काय ? बस्स, माझ्या विमल कीर्तीपक्षां मला तुझी ती तुझ्या मनाची आणि जगाची कांहीं परवा नाहीं. मी सांगेन त्याप्रमाणें तुला केलेंच पाहिजे. त्या नीच, गर्विष्ठ अधमाची —

**संयोगिता**–शिव, शिव, बाबा, हीं तुमचीं दुर्भाषणें माझ्या काळजाला घरे पांडतात. जी गोष्ट आजपर्यंत कधीं झाली नाहीं ती आतां पुढें होणार कशी ? छे, हें माझ्या हातून कधींही होणार नाहीं. या वीरमणी खेरीज जगांतील सर्व पुरुष मला आतां आपल्याप्रमाणें आणि बंधूप्रमाणें आहेत. जगांत आतां माझें बऱ्यावाईटाचे सुखदुःखाचे वांटेकरी हे आहेत.

**चंदकवी**–[ मोठ्यानें ] शाबास, संयोगिते शाबास !

**जयचंद**–( संतापून ) हाय हाय, ज्याच्याशीं माझें पक्कें वैर बांधलें आहे, ज्यानें माझा अपमान केला, त्या माझ्या हाडवैऱ्याला या चांडाळणीनें वरून, जगांत माझी अपकीर्ति करून, मला सर्वांपुढें लज्जेनें खालीं मान घालून, सर्व जनांनीं माझी छीः थू करावी; माझा

उपहास करावा, माझ्याकडे पाहून आतां तिरस्कारानें हसावें आणि माझी थट्टा करावी; असा प्रसंग ज्यापेक्षां या नीचनें आणला, त्यापेक्षां ही दुष्ट कारटी माझ्या पोटीं आली नसती तर फार फार बरें झालें असतें.

संयो०--त्यांच्या हातून जर आपला अपमान झाला असेल, अथवा एखादा मोठा अपराध घडला असेल तर आपण त्यांच्यावर राग करूं नका ? त्याबद्दल मी आपली क्षमा मागतें, आपल्या पाया पडतें. [ त्याच्या पाया पडण्यास जाते, जयचंद संयोगितेला लाथ मारतो. ]

जयचंद-[ रागानें ] निर्लज्जे, चल हो पलिकडे, त्याच्याबद्दल माझ्यापाशीं तरफदारी करायला तुला लाज वाटत नाहीं. त्यानें माझा अपमान केल्यामुळें माझ्या हृदयांत जो वैराग्नी धुमसत होता, तो तुझ्या या असल्या कृत्यानें मात्र जास्त पेटला; आतां तो समरांगणांत त्याच्या रक्तपाताशिवाय कधींही शमणार नाहीं. याबद्दलचें प्रायश्चित्त तुला आणि त्या नीचाला भोगावें लागेल ! तूं या मूर्तीला वरलेस अं: ! तुझ्या सुखदु:खाचे हेच वाटे करी ना ? बरें तर यांच्याच बरोबर तूं सुखदु:खाचा अनुभव यथेच्छ घे ! सुमती, या दुष्टेला आतांच्या आतां नेऊन किल्यांत अंधार कोठडींत या मूर्तीसह कोंडून ठेव. आपल्या कर्माचीं फळें हिला तेथेंच भोगूं दे ? हिचें मला तोंड पहाणें नको. चल-

सुमती-[ हात जोडून ] आज्ञा-पण-ताईसाहेब अज्ञान आहेत.

जयचंद-सुमती, याबद्दल तूं एक अक्षर देखील काढूं नकोस. अरे, हिला आपल्या पित्याच्या आज्ञाभंगाबद्दल हीच शिक्षा योग्य, ही अज्ञान कसली ? खबरदार माझ्या

हुकूमाशिवाय हिला कोणी मोकळी केली तर ? या पोरटीचें मन बहकविण्याला तीच दिल्लीची कर्नाटकी दासी कारण ! त्या रांडेचा एकदम शिरच्छेद करण्यास कोतवालास सांग !

**सुमती**–महाराजांनीं थोडेसें शांत व्हावें.

**जयचंद**–चला, जा, सांगितल्याप्रमाणें व्यवस्था करा. ( संयोगितेकडे वळून ) निर्लज्जे, जा आतां आपल्या पतीराजा बरोबर खुशाल आनंदानें रहा.

( प्रधान संयोगितेला नेऊं लागतो. )

**चंद**–( मोठ्यानें ) राजकन्ये धन्य तुझें प्रेम, धन्य तुझी निष्ठा आणि धन्य तुझें धैर्य. या भरत खंडांत तूं खरोखर धन्य आहेस. तुझ्या सत्प्रेमाचें, सत्भक्तीचें आणि दृढ निश्चयाचें फळ परमेश्वर तुला दिल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. हे मदांधा जयचंदा, तुझ्याही मदांधपणाचें फळ तुला लवकरच भोगावें लागेल ! हें पक्कें लक्षांत ठेव.

**संयो०**–( रडून ) शुद्ध भावानें केलेलें कृत्य देवा तुला जर अशा रितीनें आवडत असेल, तर तें खुशाल आवडो. पण बाबा, मी कोणतेही अयोग्य कृत्य केलें नाहीं असें तुम्हाला विचारांती कळल्याशिवाय राहणार नाहीं असो नशिब माझें.

( सर्व जातांत पडदा पडतो. )

अंक १ समाप्त.

---

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—खोकंद शहर येथील रणमैदानाजवळील प्रदेश.

( गोविंदराय आणि जामदेव येतात. )

**गोविंदराय**—जामदेवजी, आजच्या लढाईंत आपल्याला जय मिळून महाराजांची प्रतिज्ञा शेवटास गेली, ही परमेश्वराची आपल्यावर मोठी कृपा समजली पाहिजे.

**जामदेव**—हो, गोविंदराय सत्याचा जय हा आपला शेवटीं व्हायचाच. आपलें सैन्य जरी थोडें होतें, तरी तें त्वेषास चढल्यामुळें राजा जयचंदाचा एवढा सैन्योदधी पण आपल्या सैन्यानें तो तत्काल शोषून टाकला.

**गोविंदराय**—आज समरभूमीवर चव्हाण वीरांनीं जो आपला पराक्रम दाखविला तो खरोखर अवर्णनीय होता. बलशौर्यानें चढून जाऊन अगदीं धुंद झालेल्या कनोजवाल्यांच्या नरडीचा घोंट केव्हां घेऊं, असें आपल्याकडील प्रत्येकजणाला झालें होतें. आधींच आपल्या कन्हराय सेनापतीची सैन्याची सुव्यवस्था ठेवण्याची कुशलता, व्यूह रचण्याचें त्यांचें चातूर्य, युद्धकलेची निपुणता आणि दीर्घ अनुभव; शिवाय सर्व लोकांचीं मनें आपल्याकडें वळवून घेण्याची शैली, विलक्षण

साहस, वगैरे त्यांच्या अंगचे अप्रतिम गुण आणि सर्वप्रकारच्या लढाईच्या सामुग्रीची विपुलता असल्यावर मग जय कां बरें मिळणार नाहीं. खरा कसलेला वीर तो. यांत कांहीं संशय नाहीं.

**जामदेव**-तुह्मी अगदीं खरें बोललात. मोठा झंझावात सुटला आहे, अकाश काळ्याभोर ढगांनीं व्यापून टाकिल्यामुळें अंधार पडला आहे, समुद्र खवळून गेल्यामुळें त्याच्या पर्वतप्राय लाटा क्षणोक्षणीं धडाधड खडकावर आपटत आहेत, आणि आतां घटका अर्ध घटकेंत हा क्रोधाविष्ट झालेला सरितापति आपल्या अफाट जलोदरांत जणू काय सर्वजग सांठविण्यास तयार झाला आहे; अशा भयंकर तुफानांत एखादे तारूं सांपडलें असतां त्याचा कर्णधार जर कुशल नसला तर त्या संकटांत त्या तारवाची जशी दशा होते. तशी सेनाग्रणी कुशल नसला ह्मणजे रणांगणांत सैन्याची स्थिती होते. आज त्यांनीं शत्रुपक्षाला आपला खरा पराक्रम दाखविला.

**गोविंद**-आहो, पहिल्या तडाक्या बरोबर, आपल्या दोन तुकड्या पार कापल्या गेल्यामुळें आपल्या सैन्यानें पहिल्या प्रथम थोडीशी कचर खाल्ली; व त्यांचा गोंधळ झाला, इतक्यांत आपल्या घोडेस्वारांनीं पुढें होऊन एकसारखी कापाकापी सुरूं केली आणि त्यांना बरेंच मागें हटविलें. डावीकडच्या तुकडीनें एकदम मागून जाऊन त्यांच्यावर बाणांचा सारखा पर्जन्य पाडला. पुढून घोडेस्वाराचा, उजव्या बाजुकडून पायदळाचा, आणि मागून बाणाचा मारा असह्य झाल्या-

मुळें कनोज वीरांचा मुळींच इलाज चालेनासा झाला. ते अगदीं कोंडले गेल्याप्रमाणें झाले. मधून मधून आपले कन्हराय सेनापती; घोड्यावर बसून एकसारखे क्षणांत येथें, क्षणांत तेथें; असे चहूंकडे फिरत असून आपल्या लोकांस मोठ्यानें ओरडून उत्तेजन देत असतां एक विलक्षण चमत्कार झाला.

जाम०–कोणचा बरें तो? मी अगदीं पलिकडच्या बाजूला असल्यामुळें मला कांहीं फारसें कळलें नाहीं, फक्त वालुकराय पडला आणि त्यामुळें कनोज वीरांचा धीर सुटून ते सैरावैरा चहूंकडे पळूं लागले, एवढेंच मला माहित. मी त्यांचा पाठलाग करणार इतक्यांत कन्हराय येऊन त्यांनीं मला जगदेवरावाच्या मदतीला जा, आणि तळाकडची बाजू संभाळ; मी यांचा चांगला समाचार घेतों असें सांगून त्यांनीं आपला घोडा दावला. मी आणि जगदेवराव त्यांच्या आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था करून तुमच्याकडचें काय वर्तमान आहे तें समजण्या करितां इकडे आलों. सांगा सांगा बरें. कोणचा चमत्कार तो.

गोविंद०–चमत्कार दुसरा कसला? वालुकराय आणि कन्हराय यांचें द्वंद युद्ध! हाच!

जाम०–आणि वालुकराय जो पडला तो त्यांच्याच हातून आणि त्याच द्वंद युद्धांत तर मग!

गोविंद०–होय त्यांच्याच हातून?

जामदेव–शाबास कन्हराय शाबास! वीरा, आज आपला वंश खरोखर तूं धन्य केलास!

गोविंद–( त्या दोघांचें द्वंद्व पाहून दोन्हीकडचे वीर चकित्

होऊन गेले. त्यावेळीं त्या दोघा वीरांकडे ज्यांनीं ज्यांनीं पाहिलें त्यांना त्यांना हे दोघे भीम दुःशासन आपलें पूर्वीचें वैर स्मरून एकमेकांचे प्राण घेण्यास उद्युक्त झालेले असें दिसलें. पहिल्या प्रथम त्या दोघांची नजरा नजर होतांच दोघांनीं आपापलीं शस्त्रें उपसलीं, आणि ते एकमेकावर चालून गेले. दोघांचें द्वंद्व होत असतां जय कोणास मिळतो याची कोणास खात्री पटेना. कारण दोघेही बलानें आणि शौर्यानें सारखे ! दोघेही लढाईच्या कामांत निष्णांत. दोघेही कसलेले वीर ! बरीच वेळ त्यांची झटापट चालली होती. इतक्यांत एकानें आपला घोडा वळवून दुसऱ्याच्या मानेवर तरवारीचा मोठा वार केल्याबरोबर तो वीर लागलाच घोड्यावरून कोसळला. त्या बरोबर कनोज वीरांत एकदम हाहाकार उडाला आणि ते पळू लागले; त्यांची अशी स्थिती झालेली पाहून, कन्हराय मजजवळ येऊन बाकीच्या सैन्याची व्यवस्था लावून तुह्मी येथेंच रहा, मी आतां आलों; असें मला सांगून ते जे पुन्हा गर्दींत शिरले ते अद्याप आले नाहींत.

**जाम०**–तळाकडची व इकडची सर्व व्यवस्था उत्तम तऱ्हेची लागली आहे त्याविषयीं कांहीं काळजी करायला नको करितां ते अद्याप कां आले नाहींत हें पहाण्या करितां चला आपण जाऊं. न जाणो वेळ प्रसंग आहे.

**गोविंद**–चला माझ्याकडून तयारी आहे. ( इतक्यांत शिंगाचा शद्ब ऐकूं येतो ) थांबा, हा शिंगाचा शद्ब कोणीकडून येत आहे तो ऐका.

**जाम०**–( ऐकलेंसें करून ) हा या डाव्या बाजूनें येत आहे.

हो तिकडूनच येत आहे, ( जरा थांबून आणि पाहून ) हो शंका कशाला? तो आपल्याच सैन्याचा आहे. ते पहा, कन्हराय शत्रूचा पुरा मोड करून आणि त्यांची शौर्यश्री हरण करून इकडेच येत आहेत.

**गोविंद**–अहाहा, किती आनंदाचा आजचा हा दिवस आहे.

( इतक्यांत कन्हराय रक्तानें भरलेल्या पोशाकानें एका हातांत तरवार आणि एका हातांत वालुकरायचें शीर घेऊन येतो. गोविंदराय आणि जामदेव त्यास भेटतात.)

**दोघे**–शत्रूचा संहार करणाऱ्या आमच्या मित्राचा सदा विजय असो.

**कन्हराय**–मित्रानों, हें सर्व आपल्या महाराजांच्या कृपेचें, आणि तुमच्या आणि सकल चव्हाण वीरांच्या बाहू शौर्याचें फळ ! ( आवेशानें ) दुसऱ्याचा विनाकारण अपमान केला असतां त्याचें फळ कशा रितीनें भोगावें लागतें, आमच्या महाराजांची योग्यता त्याच्या द्वारीं हातांत दंड धरून उभें राहण्याची आहे किंवा त्याच्या सारख्या ऐश्वर्यबलानें डोळ्यावर धुंदी चढलेल्या मतिमंदाला दंड करण्याची आहे, हें यावरून त्या मदांध जयचंदाला चांगलेंच कळेल. नीचा, तुला वाटलें काय कीं, कनोज येथीलच कायत्या स्त्रिया वीररत्नें प्रसवल्या आहेत ! हातांत तरवार धरून रणांगणांत शौर्य दाखविणें हें काम कनोज येथील वीरांचें ? आर्यभूमातेच्या पोटीं जन्म घेऊन तिला धन्य करणारे असे रणशूर काय ते आम्हीच ! स्वाभिमान आणि देशाभिमानाचे मूर्तिमंत पुतळे राठोड कुळांतच जन्मास आले आहेत, बाकीचे सर्व अभिमान शून्य आणि भागूबाई असे तुला

वाटलें अं: ! आम्ही आमचे महाराज वगैरे सर्व तुझ्या घरचीं हलकीं सलकीं कामें करण्याच्या मात्र उपयोगी असे कां तूं समजतोस ? दुसऱ्याची खोड मोडण्या करितां, तुझ्या सारख्याच्या गर्व मदाची धुंदि उतरण्या करितां आणि आपलें ब्रीद संभाळण्या करितां ही आमची समशेर किती तत्पर आहे याचा अनुभव तुला आतां लवकरच येईल. मित्रांनों, चला आतांच आपण महाराजांच्या दर्शनाला जाऊं ! आजचा तुमचा पराक्रम आणि हा नजराणा पाहून महाराज फार संतुष्ट होतील.

दोघे–चला.

( सर्व जातात )

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ–पृथ्वी राजाची छावणी.

पात्रें–पृथ्वीराज आपल्या तंबूत हांतात पत्र घेऊन गादीवर विचार करीत बसला आहे, जवळ तरवार पडली आहे.

पृथ्वीराज [ आपल्याशीं ] "तुम्ही रितीप्रमाणें यज्ञसमारंभार्थ हजर व्हावें, नाहींतर राज्य खालीं करून द्यावें; आणि हें आमंत्रण पोंचल्याबरोबर इकडे निघून आल्यास तुम्हाकरितां यज्ञमंडपांत द्वारपालाचें काम राखून ठेविलें आहे तें तुम्ही हातांत छडी घेऊन करावें" [ आवेशानें ] कोण हा उद्दामपणा; काय ही सर्वोक्ति! केवढी ही आपल्या ऐश्वर्याची आणि भुजबलमदाची धुंदी ! जयचंदा,

हें पत्र लिहिलेंस त्या वेळेस खरोखर तूं शुद्धींत नव्हतास? नाहींतर हें तूं कोणाला लिहीत आहेस याचा थोडासा तरी विचार तुझ्या मनांत आला असतां. अभिमानानें आणि आपल्या शक्तीच्या जोरानें फुगून जाऊन, मनुष्य एकदा गर्वाचा मूर्तिमंत पुतळा बनल्यावर त्याला आपल्या पुढें सर्व जग अगदीं तुच्छ वाटूं लागतें. त्याला मग सुविचार सुचतो कशाला? "राज्य खालीं करून द्यावें" अः ठीक आहे; मी. राज्य खालीं करून देतों कीं, तुझ्या सारख्या गर्वांधाला पदभ्रष्ट करून आपल्या कृतीचें फळ भोगायला लावतों, हें लवकरच दिसून येईल. नीचा, तूं ह्या राजसूय यज्ञाला आरंभ केला नाहींस, तर समरभूमी कुंडांत पृथ्वीराजाचा क्रोधाग्नी पेटवून, त्यांत मोठमोठ्या राजांच्या, शेकडों वीरांच्या, असंख्य सैन्याच्या प्राणांचे आणि शेवटीं अप्तमित्राच्या, आणि आपल्या प्राणांचे विनाकारण बली देण्याकरितां तूं या महारण यज्ञाला आरंभ केला आहेस. हे राठोड वीरांनो, कनोज पौर जनानों, तुमचें या लोकींचें सर्व सौख्य नष्ट करून हा तुमचाच मदांध राजा तुम्हाला अकालीं आणि विनाकारण मृत्यूच्या भयंकर दाढेंत देण्याला तयार झाला आहे. हे सकल वीरस्त्रियांनों तुमच्या सौभाग्यावर धाड घालण्यास, तुमच्या कोमल अंतःकरणांत शोकानल पेटविण्यास, आणि तुम्हाला दुःखार्णवांत बुडविण्यास हा नीच जयचंदच कारण होत आहे. आपल्या एकट्याच्या नांवाचा सर्व जगभर टेंभा पाजळण्या करितां, एकदां मनांत आलेली आपली इच्छा तृप्त करण्याकरितां, दुसऱ्याच्या सुखदुःखाचा

आणि मानापानाचा मुळींच विचार न करितां, आपल्या स्वतांच्या आनंदा करितां हजारों जणांच्या प्राणांचे जो बळी देतो तो मनुष्य नव्हे, तर मनुष्य भक्षक मनुष्यरूपीं राक्षस होय! खऱ्या क्षत्रिय वीराला ही तुझी गर्वोक्ती आणि हा तूं केलेला अपमान खचित् सहन होणार नाहीं, आणि त्यांतून चव्हाण वीराला तर कधींही सहन होणार. अरे नीचा– [ इतक्यांत पडद्यांत शिंग वाजतें. ] ( चकित् होऊन ) काय? हा कोणाच्या शिंगाचा आवाज. जयदेवसिंग, जयदेवसिंग.

( जयदेव येऊन मुजरा करतो. )

**जय**–सरकार काय आज्ञा?

**पृथ्वी**–आतां हें शिंग कसलें वाजलें, याची चौकशी करून या?

( तो जातो )

**पृथ्वीराज**–कन्हराय तर येत नसतील, ते आज या मुक्कामीं येऊन मिळणार होते. फार करून तेच असावेत.

[ जयदेवसिंग पुन्हा येतो ]

**जय**-सरकार, आपले कन्हराय सेनापती येताहेत. त्यांच्याचा जयघोषाचें हें शिंग वाजलें.

**पृथ्वी**–( आनंदानें ) काय जयघोषाचे?

**जय**–होय सरकार.

**पृथ्वी**–तो वीर अपयश घेऊन परत कधींच येणार नाहीं. शाबास वीरा!

**जय**–( मागें वळून ) हे पहा ते आले.

[ इतक्यांत कन्हराय, गोविंदराय आणि जामदेव येतात ]

कन्हराय—महाराजांचा जयजयकार असो ! महाराजांच्या पूर्ण कृपेनें आणि चरणाच्या प्रतापानें आजच्या लढाईंत यश आलें, हें कळविण्यास मला मोठा आनंद वाटतो.

पृथ्वी-( उत्सुकतेनें ) या, या कन्हराय, या असे; वीरांनों बसा असे ! कन्हराय, माझी प्रतिज्ञा शेवटास नेऊन तुम्ही विजयश्रीला वरून आलांत यामुळें मला अत्यानंद होत आहे. ( कन्हराय वालुकरायाचें शीर पुढें ठेवतो. तें पाहून आश्चर्यानें ) कन्हराय हें काय ?

कन्ह०—त्या मदांध जयचंदानें आपणा सर्वांस यज्ञसमारंभाकरितां बोलाविलें. तेंव्हां त्याला प्रथमची भेट पाठविण्या करितां हा नजराणा आणला आहे. महाराज जयचंदाचा भाऊ वालुकराय त्याचेंच हें शीर !

गोविंद०—सेनापती साहेबांचें आणि वालुकरायाचें जें द्वंदयुद्ध झालें त्यांत तो पडला !

कन्हराय-हा मोठा शूर होता आणि त्याच्या फौजेची तयारीही चांगली होती.

पृथ्वीराज-असें असून आपल्या वीरांनीं जय मिळविला हें त्यांना मोठें भूषण आहे.

जामदेव—हा सर्व सेनापती साहेबांचा प्रताप?

कन्हराय—आजच्या लढाईंत आपल्या वीरांनीं यश मिळविलें याला कारण फक्त कनोजाधिपतीचा गर्व खंडण करण्याची उत्सुकता आणि त्यानें महाराजांचा केलेल्या अपमानानें सर्वांस चढलेला अत्यंतत्वेष; या शिवाय दुसरें कांहीं नाहीं. महाराज त्यांच्या पैकीं हें एक अमूल्य वरिरत्न हरपलें.

पृथ्वी-त्याच्या शौर्याविषयीं मी पुष्कळ ऐकलें आहे. आज

तुह्मी सर्वांनीं ही मोठी कामगिरी बजाविलीत. तुमच्या सारखे एकनिष्ठ आणि जिवाला जीव देणारे शूर वीर मजजवळ आहेत म्हणूनच मला यश येतें.

**कन्हराय**–महाराज, आपल्या सारख्या दयाळू प्रभूच्या कृपा दृष्टीनेंच आम्हां सेवकजनांच्या बाहूंत शौर्य येतें. ज्या वेळेस त्या गर्विष्ट जयचंदाला समरांगणांत दोन हात दाखवून बांधून आणूं, आणि कनोज शहरांत हिंडायला लावूं तेव्हांच आह्माला संतोष होईल. या आमच्या तरवारी त्या नीचानें केलेल्या आपमानाचा सूड घेण्याकरितां आणि त्याच्या रक्ताचे प्राशन करण्याकरितां कशा तयार झाल्या आहेत. आणि त्याची व आमची रणांत समक्ष गांठ केव्हां पडेल असें आम्हाला झालें आहे. सरकार, या वेळेला जर तो जयचंद सांपडता तर तोही आपल्या बंधूच्या भेटीस लागलाच गेला असतां ?

**पृथ्वीराज**–त्यानें आपल्या बंधूला आधीं पुढच्या तजविजी करितां पाठविलें आहे; मागून मोठ्या थाटानें तोही जाणार आहे. कन्हराय, आपल्या फौजेंत आणखी जास्त भरती करा. चांगला बंदोबस्त ठेवा. जयचंद आपल्या बंधूच्या वधाचें वर्तमान ऐकून स्वस्थ बसणार नाहीं. आपली तयारी चांगली असूंद्या. शत्रू कोणत्या वेळेला अकस्मात येऊन पडेल याचा नेम नाहीं.

**कन्हराय** सरकार आज्ञेप्रमाणें सर्व होईल.

[ जयदेवसिंग येऊन पृथ्वीराजाजवळ पत्र देतो. ]

**पृथ्वी०**–[ पत्र पाहून ] अक्षर तर ओळखीचें दिसतें. को-

णाचें बरें असावें हें ? जयदेवसिंग कोणी दिलें पत्र ? कुठें आहे तो मनुष्य ?

जय०–सरकार हा मनुष्य आपल्या छावणी बाहेर उभा आहे, तो मी कनोज शहराहून आलों आहे, सरकारची एकांति भेट व्हावी असें ह्मणतों. मग जशी आज्ञा–

पृथ्वी०–" एकांतीं भेट झाली पाहिजे " असें म्हणतो ?. हा गृहस्थ कोण असावा बरें ? कांहीं तर्क चालत नाहीं. बरें, जा, त्याला घेऊन ये. पाहूंतर खरें तो काय म्हणतो तें.

( जयदेवसिंग जातो आणि एका मनुष्यास घेऊन येतो. )

रूप०–[ मुजरा करून, आपल्याशीं ] आज किती तरी दिवसांनीं महाराजांचें चरण दिसले ! दैवा, माझ्यावर आजपर्यंत असलेली तुझी वक्रदृष्टी आतां पुरे कर आणि या चरणाचा आश्रय सदोदित घडूं दे !

पृथ्वी०–तूं कनोज शहराहून आलास काय ? तुझें नांव काय ?

रूप०–होय सरकार. या आपल्या सेवकाला रूपसिंग म्हणतात.

पृथ्वी०–काय तुझें काम आहे ?

रूप०–महाराजांची आणि माझी एकांतीं भेट व्हावी अशी मी पत्रांत विनंति केली आहे.

पृथ्वी०–हे माझे सेनापती आहेत. यांच्या समोर बोलायला तुला कांहीं एक हरकत नाहीं.

जामदेव–मला वाटतें हा कोणी तरी हेर असावा !

कन्हराय–हें पहा, जर तूं दंगेखोर, लुच्चा, अथवा हेर आहेस अशी आमची खात्री झाली तर तुझी शंभर वर्षें भरलींच म्हणून समज ! त्या वालुकरायाचीही जशी दशा झाली आहे, तशी दशा करून याच्या बरोबर जयचंद

महाराज.कडे तुझी रवानगी करून देऊं ! ( रूपसिंग शीर पाहून चपापतो. ) बाकी निरपराधी मनुष्याला शिक्षा करणें, दुसऱ्याची मानखंडना करणें, हें आमच्या महाराजांचें ब्रीद नव्हे ! तेव्हां जें काय तुला सांगायचें असेल तें खरें सांग ?

रूप–( दुःखानें ) शिव, शिव, एकूण वालुकरायाचा शेवट असा झाला ना ? नशिब बिच्याऱ्याचें ! आतां तो स्वयंवर समारंभ आटोपलाच ह्मणायचा ! महाराज, याचा परिणाम काय होईल, आणि आपल्यावर काय काय संकटें येतील हें माझ्याच्यानें सांगवत नाहीं. महाराज जयचंद या बद्दल आकाशपाताळ एक करून पक्का सूड घेण्याला कधीं कमी करणार नाहींत. तें सर्व असो, पण यामुळें सध्यां त्या बिच्याऱ्या गाईला मात्र फुकट हाल अपेष्टा भोगाव्या लागतील. देवकरो आणि तिचा त्यांत अंत न हो ह्मणजे झालें.

पृथ्वी०–अरे तूं हें काय बोलतोस ! ती कोण, हाल अपेष्टा कोणाला भोगाव्या लागणार, आहे काय ? तुला वेड तर लागलें नाहीं.

कन्ह०–महाराज, मला हा कोणी लुच्चा माणूस दिसतो. ( तरवार दाखवून ) अरे ए शहाण्या मनुष्या, तूं कोणापुढें बोलत आहेस, हें तुझ्या लक्षांत नाहीं वाटतें ! ही पाहिलीस ना ? नीट शुद्धीवर ये, फुकट आपल्या जिवाचा बळी कां देतोस ?

रूप०–महाराज, आपण उगीच रागावूं नये. मी जें ह्मणतों त्यांत एक अक्षर देखील खोटें नाहीं. जसें निरपराध्यास शासन करायचें नाहीं असा आपला नेम आहे,

तसाच प्राण गेला तरी खोटें बोलायचें नाहीं आणि असेल तें स्पष्ट बोलायचें हा माझाही नेम आहे.

पृथ्वी०–असा मनुष्य आह्माला फार आवडतो !

रूप०–सध्यां जें जयचंद महाराजामध्यें आणि आपल्या सरकारामध्यें वैर उत्पन्न होऊन हें एवढें रण माजलें, आणि ज्याच्यामुळें राजकन्या संयोगितेला अतोनात दुःख सोसावें लागत आहे, याला कारण दिल्लीपती महाराज, असें सर्व जण ह्मणतात !

कन्ह०–( रागानें ) हरामखोरा, याला मुख्य कारण तुम्हीच नीच राठोड, आणि तुमचा तो मदांध जयचंद ! तुम्हाला तुमच्या ऐश्वर्याचा आणि बलाचा गर्व झाला आहे. त्यामुळें तुम्ही सर्व जणांना एखाद्या कस्पटाप्रमाणें समजतां ! सर्व जणांनीं तुमच्यापुढें माना वांकवून, तसें निमुटपण वागावें. आणि अशा रितीनें आपण मात्र सर्वांवर सार्वभौमत्व गाजवावें असें तुम्हाला वाटतें. भरसभेंत दुसऱ्याची मानखंडना करणें आणि थट्टा करणें, यांतच तुम्हाला संतोष आणि भूषण वाटतें; या सर्वही गोष्टी आम्हांला कळत नाहींत अथवा आम्ही त्या विसरलों आहोंत असें तुम्ही समजूं नका ! या तुमच्या सर्व नीच कृत्याबद्दल तुमच्या डोळ्यांना समरांगणांत जेव्हां चांगलें अंजन मिळेल, तेव्हां तुमची दृष्टी साफ होईल. एवढ्यानेंच झालें असें समजूं नका ? हा तर नुसता आरंभ आहे ! अरे कृतघ्नानें, चव्हाण वीरांचे उपकार इतक्यांत विसरलांत काय ? त्याला अद्याप फार दिवस कांहीं झाले नाहींत. खरोखर तुमच्या सारख्या नीच लोकांवर उपकार करणें म्हणजे सर्पाच्या पिलांना दूध पाजून

त्याला ममतेनें वाढविण्या सारखें आहे. तुम्ही आपल्या उपकार कर्त्यांवर उलटायला कधीं कमी करणार नाहीं; आणि हा तुमचा दुष्ट स्वभाव जगाला आतां चांगल्या प्रकारानें समजून चुकला आहे. मूर्खा, तुला आमचे महाराज या गोष्टीला कारण आहेत असें म्हणायला लाज नाहीं वाटत ? पुन्हा असे शब्द बोललास तर जीभ छाटून टाकीन !

रूप–दुसऱ्या गोष्टी खऱ्या असतील कीं नसतील हें मी सांगू शकत नाहीं, पण राजकन्येच्या दुःखास मात्र महाराजच कारण आहेत, हें मी स्पष्ट सांगतों. याबद्दल माझें शीर गेलें तरी हरकत नाहीं. आणखी महाराजापाशीं माझी हात जोडून इतकीच विनंती आहे कीं, जर महाराजांनीं तिची या दुःखांतून सुटका केली नाहीं, तर एक स्त्री हत्या महाराजांच्या शिरावर बसून, एक अनुपम सुंदर स्त्री रत्न हातचें गमावल्यासारखें होईल, आणि त्या-बद्दल मागून महाराजास पश्चाताप होईल. दुःखिताची दुःखापासून सुटका करायची, हें जें महाराजांचें नेहमींचें व्रत तें महाराजांनीं खरें करून दाखविण्याची व खऱ्या परिक्षेची ही एक वेळ आहे.

पृथ्वी-[ आश्चर्य चकित होऊन ] माझ्यामुळें त्या बिचाऱ्या राजकन्येला दुःख भोगावें लागतें हें मोठेंच आश्चर्य आहे. माझ्या करितां दुसऱ्यानें हाल सोसावें, मग तो पुरुष असो, कीं स्त्री असो, गरिब असो कीं श्रीमंत असो, कोणी कोणत्याही स्थितींत असो, हें मला कधींही सहन होणार नाहीं.

कन्ह०–अरे शहाण्या, राजकन्येच्या दुःखाचें कारण आमचे

महाराज हें तूं कसें म्हणतोस तें आम्हाला कळत नाहीं. त्याचा तूं स्पष्ट खुलासा कर म्हणजे त्याचा प्रतिकार करण्याला आमच्या महाराजाकडून एक क्षणभर देखील उशीर लागणार नाहीं.

रूप०–अशी माझी पूर्ण खात्री झाली म्हणून तर मी येथ पर्यंत येण्याचें धाडस केलें. महाराज काय सांगूं, राजकन्या संयोगितेसारखें सुंदर स्त्री रत्न आज या भरत खंडांत सांपडणें कठीण आहे. आपल्या अत्यंत सौंदर्याबद्दल गर्व वाहणाऱ्या ज्या देवांगना त्यांनीं सुद्धां तिचें रूप पाहून लाजून खालीं मान घालावी. ती इतकी सुशील आणि सद्‌गुणी आहे कीं, कनोज शहरांतील प्रत्येक मनुष्य तिचे सद्‌गुण गात आहेत. फार काय सांगूं, प्रजाजन केवळ तिच्या सुशील स्वभावामुळें प्रत्यक्ष महाराज जयचंदापेक्षां तिच्यावर जास्त ममता करतात, आपल्या राज्याचें हें एक भूषण आहे असें सर्वांस वाटतें, आणि तिची होत असलेली छळणूक पाहून प्रत्येक जणाच्या डोळ्यांतून अश्रु गळल्याशिवाय राहत नाहींत. परंतु या तिच्या अमोल्य सद्‌गुणाची किंमत त्यांना कशी ती मुळींच होत नाहीं.

पृथ्वी–काय ? जयचंदाकडूनच तिला त्रास होत आहे ?

रूप–होय महाराज, प्रत्यक्ष-जन्मदात्या पित्याकडूनच ! त्यांनीं जे तिचे हाल चालविले आहेत, त्यावरून त्यांचें पितृवात्सल्य कसें नष्ट झालें, अथवा त्यांच्या ठिकाणीं त्याचा मुळींच अभाव आहे असा लोकांना भ्रम पडतो.

हें असलें रत्न त्यांच्या पोटीं निर्माण करण्याला त्या विधात्याला दुसरी जागाच कशी सांपडली नाहीं कोण जाणें !

**कन्हराय**-प्रत्यक्ष पोटच्या मुलीची जर ही स्थिती तर दुसऱ्याची कथा काय ? दुष्टा, जयचंदा, तुझ्या पापाचा घडा आतां भरत आला आहे असें समज !

**रूप**-महाराजांचें सुंदर रूप, शौर्य आणि कनोजच्या नागरिक जनावर केलेले उपकार, वगैरे महाराजांच्या अवर्णनीय गुणामुळें राजकन्येचें महाराजांच्या ठिकाणीं जडलेलें अत्यंत निर्मल प्रेम, आणि जयचंद महाराजाचें आणि आपलें उद्भवलेलें वैर हीं तिच्या दुःखाचीं कारणें आहेत. यांत दोष तिच्याकडे कीं महाराजांच्या गुणाकडे, याचा विचार महाराजानींच करावा !

**पृथ्वी**०-[ आनंदानें ] सांगासांगा, रूपसिंगजी त्या ठिकाणीं कसे कसे प्रकार घडले ते, सांगा पाहूं ?

**रूप**-महाराज, त्या सर्व गोष्टी जर मीं साद्यंत सांगूं लागलों तर त्याला सबंध एक दिवस देखील पुरणार नाहीं. प्रथम राजकंन्येचा विवाह परमारवंशांतील सरदार कहरकंठीर यांच्या बरोबर लावावा, असा महाराजांचा फार फार हेतू होता; पण राजकंन्येनें त्यांना नाकरल्यामुळें महाराजानीं मग स्वयंवराचा समारंभ केला.

**पृथ्वी**-पुढें मग ?

**रूप**०-नंतर त्या सुशील राजकन्येनें सर्वांसमक्ष तिच्या मनांत ठसलेली महाराजांची सुंदर मूर्ती जी स्वयंवर मंडपांत उभी होती तिलाच माळ घातली. मग काय विचारतां ? जिकडे तिकडे एकच गडबड उडून गेली. जयचंद

महाराज रागानें अगदीं लाल होऊन गेले. आधींच महाराजांशीं त्यांचें वैर, त्यांत आपल्या मुलीनें आपल्या शत्रूस वरून असा अपमान केल्यामुळें त्यांच्या क्रोधाग्नीवर तेल पडून तो जास्त भडकला; आणि त्यांत त्या बिचारीच्या प्राणाची त्या वेळीं आहुती पडली असती, परंतु कांहीं सुदैवानें तो दुर्धर प्रसंग टळून त्याबद्दल तिला त्या महाराजांच्या मूर्तिसह प्रचंड किल्ल्यांत अंधार कोठडींत आपले दुर्दिन कंठावें लागत आहेत. जयचंद महाराजांच्या हट्टीपणापुढें आणि क्रोधापुढें कोणाचें कांहीं चालत नाहीं. तीं मात्र दैवयोगानें कधींतरी सुदीन उगवेल या आशेवर महाराजांच्या चरणीं लक्ष ठेवून तो कारागृहवास भोगीत आहे.

**कन्हराय**—तूं हा प्रकार प्रत्यक्ष पाहिलास ?

**रूप**—होय—महाराज—! मीं त्यांच्या एका विश्वासूक दासीचा भाऊ आहे. तीही त्याच स्थितींत होती. माझ्या बहिणीनें हा सर्व प्रकार महाराजांच्या कानावर घालण्या करितां मला मुद्दाम गुप्त रीतीनें इकडे पाठविलें.

**पृथ्वी**—[ रागानें ] अरे दुष्टा, जयचंदा, तुझ्या कृतघ्नपणाचा आणि निष्ठुरतेचा असा कळस होईल असें मला वाटलें नव्हतें. आतां तुझी उपेक्षा करून उपयोगी नाहीं. कन्हराय सर्व फौजेची तयारी करून कनोज शहराकडे मोर्चा फिरवा.

**कन्ह०** आज्ञा सरकार.

**रूप**—महाराज राजकन्येची सुटका एकदम शहरावर हल्ला करून होणार नाहीं, उलटा तिच्यावर भलताच प्रसंग

गुदरेल! हें काम युक्तीनेंच पार पाडलें पाहिजे! आधीं राजकन्या हस्तगत करून घ्यावी आणि मग सामना करावा !

पृथ्वी–तें कसें होणार?

रूप–त्या विषयीं महाराजांनीं निष्काळजी असावें. तें काम माझ्याकडे लागलें. जर मीं तें काम पार पाडलें नाहीं आणि दगेखोर असा ठरलो तर हें शीर आपलें आहे.

पृथ्वी–नाहीं, रूपसिंगजी तुमच्या विषयीं आमच्या मनांत आतां संशय राहिला नाहीं. कन्हराय रूपसिंगजी सांगतात तें खोटें नाहीं. आपलें काम युक्तीनेंच साधून घेतलेले चांगलें? रूपसिंगजी तुम्ही नेहमीं आमच्या जवळ असावें !

रूप–[ मनाशीं ] मी त्याचीच इच्छा करतों. [ उघड ] महाराजांच्या चरणाची सेवा करावी यापेक्षां मला कांहीं नको.

पृथ्वी–कन्हराय, यांची चांगली बरदास्त ठेवा. पुढची व्यवस्था कशी काय करायची याबद्दल आपण रात्रीं विचार करूं. तुम्हां सर्वांस आज फार श्रम झाले आहेत; जा आतां विश्रांती घ्या.

कन्ह–आज्ञा महाराजाची. कनोजाधिपतीकडे हा नजराणा पाठवून दिल्यानें आपल्या बंधूची काय स्थिती झाली व पुढें आपलीही काय होईल हे त्याला कळून येईल.

पृथ्वी–ठीक–

( कन्हराय वगैरे मंडळी जातात. )

[ आपल्याशीं ] अहाहा, राजकन्ये, तुझे गुण ऐकून माझ्या मनांत जो प्रेमांकूर उद्भवला होता, तो या

रूपसिंगाच्या वृत्तांत जिवनानें चांगला विस्तृत होऊन आतां तो लवकरच फलद्रुप होईल अशी मला पूर्ण खात्री वाटूं लागली. संयोगिते, तुझ्या निष्कपट प्रेमाला; गुणाला आणि सौंदर्याला खरोखर मी योग्य नाहीं. माझ्यावर जें तूं प्रेम ठेवलेंस, आणि मला आपलें सर्वस्व अर्पिलेंस त्याची फेड मजकडून अशा रितीनें होत आहे. कोण अभागी मी? धन्य तुझें प्रेम, धन्य तुझा निश्चय, आणि तें कनोज शहरही धन्य, कीं, ज्या ठिकाणीं तुझ्यासारखें अद्वितीय सुंदर रत्न निर्माण झालें. नीचा जयचंदा, तिनें मला शुद्ध भावानें वरिलें म्हणून त्या बिचारीला कारागृहांत टाकलेस काय? मूर्खा-तुझी अक्कल गेली कोणीकडे? आतां हें काम लांबणीवर टाकून उपयोग नाहीं. सुंदरी, तुला ज्यानें विनाकारण दुःख दिलें त्याचा सूड घेतल्या शिवाय, तुझी तेथून सुटका केल्याशिवाय, आणि चव्हाण वंशांतील वीरांचें सामर्थ्य पुन्हां त्या मदांधाला दाखविल्या शिवाय ही तरवार मी कधींही खालीं ठेवणार नाहीं. जयचंदा, जोंपर्यंत पृथ्वीराज जिवंत आहे तोंपर्यंत तुला सुखाची आणि स्वस्थतेची मुळीं आशा करायाला नको. आतां द्वेष, युद्ध, दुःख आणि सूड हेच तुझें अनुयायी असें समज !

( जातो. )



## प्रवेश ३ रा.

स्थळ–गंगेच्या काठच्या किल्ल्यांतील संयोगितेची खोली.

पात्रें–( संयोगिता आणि तिची दासी कुवरबाई, जवळ एका बाजूला पृथ्वीराजाची मूर्ती ठेविली आहे )

संयोगिता–( आपल्याशीं ) ती बिचारी तारा येथून नाहींशीं झाली म्हणूनच सुटली, नाहींतर ती माझ्या करितां विनाकारण प्राणाला मुकती. जिथें असेल तिथें बिचारी खुशाल असो. पण तारे, आतां या अभागिणीचे मनोरथ कशानें पूर्ण होणार ? तूं असतीस तर कांहीं तरी तजवीज करून माझें हेतू पूर्ण केले असतेस ! आतां त्या सर्व गोष्टी जागच्या जागींच राहिल्या. माझ्या आयुष्याचे दिवस आतां मला या बांदिवासांतच घालविले पाहिजेत. इथें आहे तेंही कांहीं वाईट नाहीं. एक प्रकारें चांगलेंच आहे. त्या मूर्ख शिरोमणीचा तरी माझ्या मागचा त्रास चुकला. दीन दयाळा तुला जर या अभागिणीची कांहीं कींव आली तर त्या मनमोहनाची आणि माझी एकदां दृष्ट भेट तरी होऊंदे ह्मणजे झालें. माझे मनोरथ पूर्ण न होतां जर मला मरण आलें तर मी तें मग मोठ्या आनंदानें पतकरीन. ( मूर्तीकडे पाहून ) प्रियकरा, आपल्या करितां ही दासी किती दुःख भोगतें आहे, माझ्या हृदयांत काय कल्लोळ उठला आहे, प्रत्येक क्षणीं माझ्या मनाची स्थिती काय होत आहे, हें सर्व आपल्याला कशानें कळणार ? काय ह्मटलें, कीं मला दुःख होत आहे आणि

तें आपल्यामुळें. छे, छे, महाराज तसें नव्हे बरें! अशा स्थितींतही आपला समागम आहे हें सुख मला काय कमी आहे? आपल्याला आणि मला एका ठिकाणीं ठेविलें, हें तरी बाबांचें मजवर मोठे उपकारच आहेत. प्रिया माझ्याशीं नाहीं कां बोलायाचें? आपण कांहीं माझ्या बाबा सारखे निष्ठुर नाहीं. बाबांनीं आपला अपमान केला म्हणून आपण मजवर रागावलांत? म्हणूनच कां आपण मजशीं मौन धरलेंत! पण यांत माझ्याकडे काय दोष? आपल्या अलौकिक शौर्यगुणावर लुब्ध होऊन मीं आपलें तनमन आपल्याला अर्पण केलें आहे, आणि आपण आतां या प्रेमानें बांधलेल्या दासीचा अव्हेर केला तर मग मात्र माझी धडगत नाहीं. मी मग जगांत असून नसून सारखीच! महाराज बोला हो बोला? एक शब्द तरी बोला. तेवढ्यानेंच मला मोठा आनंद होईल आणि मी आपल्यास मोठी भाग्यवान समजेन.

कुवर–( मनाशीं ) यांचें मन कांहीं ठिकाणावर नाहीं. याना त्यांच्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं; आणि तिकडे दिल्लीपतीचें नुसतें नांव काढलें कीं, महाराजांच्या अंगाची अगदीं आग होऊन जाते. काय होईल तें कांहीं कळत नाहीं दुसऱ्या कोणत्या तरी गोष्टीकडे यांचें मन वळवून पहावें! ( उघड ) ताईसाहेब, ही धातूची मूर्ती आपल्याशीं बोलेल कशी? आपलें दुःख त्यांना कळणार कसें, आणि त्याचें निवारण तरी होणार कसें? अशा योगानें आपली प्रकृती मात्र जास्त बिघडेल!

संयोगिता–नाहीं नाहीं. तूं आपली कांहीं तरी बडबडतेस

झालें. त्यांना जर माझी दया येणार नाहीं तर मग आतां माझ्यावर दया करणारें दुसरें कोण; आणि ते माझ्याशीं बोलणार नाहींत असें कधीं कधीं होणार नाहीं. तूंच कांहीं तरी बोलतेस ह्मणून स्वारी माझ्याशीं बोलत नाहीं.

कुवर–ताईसाहेब पण ही निर्जीव मूर्ती ! हिच्यांत जेव्हां जीव येईल तेव्हां ही आपल्याशीं बोलेल.

संयो०–काय तर महाराज माझ्याशीं मुळींच बोलणार नाहींत.

कुवर–होय बाईसाहेब तसेंच !

संयो०–( दुःखानें ) संयोगिते, आतां मात्र तूं खरी फुटक्या नशिबाची ! कपाळ करंटे कशाला जन्माला आलीस ? ज्यांच्या करितां मी सर्वस्वावर पाणी सोडलें, ज्यांच्या करितां सर्व दुःख सहन केलें, ज्यांच्या करितां मी बाबांच्या रागास आणि या हाल अपेष्टेस मुळीं जुमानलें नाहीं, त्यांच्या मुखांतून एक शब्द शुद्धां ऐकण्याचें माझ्या नशिबीं असूं नये; देवा इतकी मी अभागीण कशानें झालें, असें मीं काय पाप केलें आहे. हाय, हाय–[ असें म्हणून मुर्च्छित पडते. ]

कुवर–[ संयोगितेला वारा घालून सावध करते ] आतां इथें काय करावें. ताईसाहेब सावध व्हा, सावध व्हा. [ ती सावध होते ] ताईसाहेब, त्या पलिकडल्या खिडकींत चलता कां ? तेथून गंगेच्या प्रवाहाची, आपल्या या किल्ल्यांतील छोटेखानी बागेची कशी छान शोभा दिसते. ती पाहून आणि बागेंतील चांगला गार वारा लागून आपल्याला अंमळ बरें वाटेल. या वसंतऋतूंत आणि त्यांतून आज स्वच्छ चांदणें पडल्यामुळें चहुंकडे कसें

शांत असून, उल्हासवाणें वाटत आहे तें पाहून तरी आपल्या मनाला थोडीशी हुशारी येईल.

संयो०—बाई मला तें कांहीं एक नको. ज्या दिवशीं या मूर्तींत जीव येईल त्याच दिवशीं माझें मन संतुष्ट होईल, तोच माझा सुखाचा आणि भाग्याचा दिवस. त्याच दिवशीं हे सर्व उपचार मला गोड लागतील; तोंपर्यंत हे सर्व व्यर्थ. आणि त्या बरोबर माझें जिणेंही व्यर्थ. त्या वीरशिरोमणीच्या भेटीचा सुदीन गडे केव्हांग येईल?

कुवर—ताईसाहेब, जरा धीर धरा म्हणजे सर्व आपल्या मनाप्रमाणें होईल.

संयोगिता—तुम्ही सर्वजणीं मला बरें वाटावें म्हणून माझ्या मनाप्रमाणें बोलतां, पण तसें होण्याचें एक देखील अनुकूल चिन्ह दिसत नाहीं. बाबांच्या रागाची स्थिति पूर्व दिवसाप्रमाणेंच आहे. आणि त्यांची तऱ्हाच कांहीं निराळी. त्या दिवसापासून त्यांनीं माझी आणि आईची भेट देखील होऊं दिली नाहीं. बाई, मीं अभागी किती तरी म्हणून सांगूं. माझ्यामुळें तिलाही अतोनात त्रास सोसावा लागत आहे. आई, जीं तूं मला एक क्षणभर देखील विसरत नव्हतीस, माझ्या शिवाय तुला चैन पडत नसे, माझ्या शिवाय तुला एक घांस देखील जात नसे, मीं जरा डोळ्याआड झालें कीं, तुझा जीव खालींवर होत असे, जी तूं माझ्यामुळें आपल्यास धन्य मानीत होतीस, ती मीं तुझ्या पोटीं आल्यामुळें तुझ्या दुःखाला, बाबांच्या रागाला, आणि त्या वीराशिरोमणीचा अपमान होण्याला कारण झालें. आई, माझी आतां गत कशी होणार?

त्या मेल्यानें बाबाना कशी भुरळ घातली आहे कोण जाणें? तो रोज बाबाना जाऊन नाहीं नाहीं त्या चहाड्या सांगत असेल, आणि त्यामुळें तुला जास्त त्रास आणि दुःख भोगावें लागत असेल. त्याच्या शिवाय बाबाना मोठा विश्वासूक, शूर आणि सद्गुणी मनुष्यच सांपडत नाहीं.

कुवर—बाईसाहेब, महाराजा सारख्या लहरी आणि रागीट मनुष्याचें काय? एकदा जो त्यांच्या मनांत भरला तो भरला. त्याच्या अंगीं तसे खरे गुण आहेत कीं नाहींत याची पारख मग कोण करतो.

संयो०—पण त्यांच्या विलक्षण लहरीचा आणि रागीटपणाचा परिणाम दुसऱ्याला सध्यां भोगावा लागत आहे खरा. [ उसासा टाकते व अंमळ स्तब्ध बसते ]

कुवर०—बाईसाहेब, बोला, अवेंच बोलून थांबलांत कां? मनांत अगदीं शंका धरूं नका!

संयो०—तुझ्याविषयीं माझ्या मनांत शंका कधींच येणार नाहीं; पण तुला एखादें काम सांगितलें आणि तुझ्यावरच एखादें संकट आलें तर—म्हणून भीति वाटते, दुसरें काय?

कुवर०—आपल्यापेक्षां माझे प्राण मला जास्त नाहींत.

संयो०—मी जें काय तुला सांगणार आहे, तें बाबांच्या कानीं गेलें कीं तुझ्या जिवाशीं गांठ पडेल, आणि आईलाही त्रास होईल.

कुवर०—सांगा तर खरें!

संयो०—माझें दुसरें कांहीं काम नाहीं. फक्त तूं आईकडे जाऊन तिला कसेंही करून इथें घेऊन ये आतां जर ती इथें आली तर कोणाला फारसें कळायचें सुद्धां नाहीं.

एवढें जर माझें काम तूं मोव्या खबरदारीनें केलेस तर मी तुझें उपकार जन्मोजन्म विसरणार नाहीं. आम्हा मायलेंकराची भेट करून दिल्याचें श्रेय तुला येईल. तिला मी केव्हां पाहीन असें मला झालें आहे. बाई एवढें माझें काम तूं कसेंहीकरून करच ! करशील ना ? देव तुझें कल्याण करीन.

कुवर०–( मनाशीं ) याना इथें एकट्या सोडून जावें कीं नाहीं. तो मेला कहर कंठीर येथें येऊन याना त्रास देऊं लागला तर कसें करावें ! बाहेरचे सर्व पहारेकरी आणि दुसऱ्या दासी सर्व त्याच्या धाकांत ! लवकर जाऊन यावें झालें ! आतांच कांहीं तो फार करून येणार नाहीं. न जाणो तो मेला चांडाळ महाराजांची जास्त मर्जी असल्यानें येथें येऊन यांच्याशीं चवळपणा करायला कमी करणार नाहीं; तेव्हां यांच्या स्वतांच्या रक्षणाची कांहीं तजवीज करावी आणि मग जावें ! ( विचारकरून ) असे करावें म्हणजे झालें ?

संयो०–काय तुला मोठें संकट पडलें ! खरेंच, कोणाला आपला जीव नकोसा झाला आहे. बाई नको माझ्याकरितां तूंही संकटांत पडूं ! मी मेली अभागीण एकटी दुःख भोगतें आहे तेवढें पुरें ! आई; आतां तूं देखील मला अंतरलीसना ! देवा देवा, काय हा आम्हांवर तुझा कोप

कुवर०–ताईसाहेब, मी आपल्या प्राणाबद्दल मुळींच सुद्धां भीत नाहीं; आतां जाऊन आईसाहेबास घेऊन येते ! ( दुसऱ्या खालींतून खंजीर घेऊन येतें ) ताईसाहेब हें आपल्यापाशीं राहूं द्या.

संयो०–हेंग कशाला !

कुवर०—न जाणों रात्रीचीवेळ आहे प्रसंग आहे ! त्यांतून तुम्ही एकट्या असें एखादें जवळ असावें हें बरें.

संयो-हें एक चांगलें केलेंस.

कुवर—मी लवकरच येते ! सावधपणानें रहा. [ ती जाते ]

संयोगिता—( आपल्याशीं ) बिचारी ही कुवर किति तरी चांगली ? माझ्या करितां तिचा जिव तिळतिळ तुटतो. पण ती करणार काय ? माझें बरें व्हावें असें तिच्या हातीं आहे काय ? तिला माझ्या करितां क्षणोक्षणीं आपल्या प्राणाची भीती आहे. अशा वेळीं ही जर इतराप्रमाणें व बाबाच्या हुकुमाप्रमाणें चालती, तर मग माझ्या दुःखाला मर्यादाच नव्हती. मला मग तोंडा बाहेर एक शद्ब देखील काढण्याची चोरी झाली असती. आमची स्त्रियांची सर्वस्वि परस्वाधीन स्थिती असावी, आम्हाला आमचें स्वताचें म्हणून कांहीं असूं नये, असें करण्याला देवा आम्ही तुझ्या घरीं बाबा असें काय पाप केलें आहे; किंवा तुझ्या घरचा हा असाच न्याय आहे कोण जाणें ! खरोखर, व्यर्थ, व्यर्थ आमच्या स्त्रियांचा जन्म ! [ उसासा टाकते ] वल्लभा, माझी इकडे काय स्थिती आहे; आणि माझ्यामुळें इथें किती-जणांना त्रास होत आहे, हें आपल्याला कशानें समजणार ? माझें मेलें असो; पण आईला, माझ्या या चाकर माणसानां आणि आपल्याला बाबांच्या रागामुळें होत असलेला त्रास माझ्यानें पहावत नाहीं; बिचारी आपल्या पोटाकरितां चाकरी झाली म्हणून तेवढ्या करितां त्यांना आपल्या जिवाची नेहमी भीती कां असावी ? माझ्या बरोबर त्यांचेंही दुर्दैव ओढवलें. प्रियकरा, बाबांनीं

आपल्यावर काकाना पाठविलें आहे, आणि मागून मोठें सैन्य घेऊन आपण स्वतां स्वारी करणार म्हणून ऐकतें. जर कदाचित् कोणाचेंही लढाईत बरें वाईट झालें, तर त्या बद्दलचें अपयशाचें सर्व खापर माझ्या माथीं फुटेल. मला मग जगांत तोंड काढण्यास देखील जागा राहणार नाहीं. सर्वजण मला कुळबुडवी म्हणतील, माझा तिरस्कार करतील, जेव्हां तेव्हां माझ्याकडे पाहून नाक मुरडतील. आणि तें सर्व दुःख मला मग मुकाट्यानें सोसावें लागेल ! तर हा सर्वांचा त्रास चुकविण्याकरितां मीच एकटी जगांतून नाहिंशी झालें ? तर चांगलें नाहीं कां होणार ? एकदां मनाचा धडा केला कीं झालें ! मग करावें कां असें ! आणि व्हावें कां मोकळें ! ( स्तब्ध होते ) काय, नको. कां बरें ? मी भित्री म्हणून ! छे, तसें नव्हें. ही मेली पुढील सुखाची आशा आड येते ! नाहीं तर, या मेल्या जिवाची मीं मुळीं सुद्धां पर्वा केली नसती ! प्रियकरा, आपल्या अनुपम गुणांनीं माझ्या अंतःकरणांत रेखलेली आपली सुंदर मूर्ती केव्हां एकदां डोळे भरून पाहीन असें मला झालें आहे. मला जर पंख असते तर मी उडुन आपल्या सेवेला आलें असते. पण मी काय करूं ? मी जशी सर्वस्वी परस्वाधीन आहे, तसे कांहीं आपण नाहीं. मग आपणच येऊन का बरें मला दर्शन देत नाहीं. आपल्या शिवाय वीरश्रेष्ठा, मला या दुःसह विहर त्रासांतून मोकळें करणार कोण आहे. या आतां अंत पाहूं नका.

( इतक्यांत कहरकठोर येतो. त्याला पाहून संयोगिता चपापते. )

संयो०–[ मनाशीं ] या वेळेला ही साडेसाती येथें कशी आली कोण जाणें ! देवा—

कहर–[ आनंदानें ] हे रा-ज-क-न्ये, सं-यो गि-ते, अग हा तुझा त्रास केव्हांच चुकला असतां ! तो तूंच आपल्या हातानें आपल्याला लावून घेतला आहे. एका क्षणांत तुला हा वीर सौख्याच्या उंच उंच शिखरावर नेऊन बसवील. फक्त तुझ्याकडून मला हुकार मिळण्याचा, आणि मी महाराजांना सांगण्याचा कायतो अवकाश ! त्यांना मग फार मोठा मोठा आनंद होईल. खरोखर तुझ्या सारख्या अत्युत्तम, सुंदर, नाजूक आणि नेहमीं आनंद सुखांत लोळणाऱ्या विलासिनी राजकन्येनें अशा बंदिवासांत राहणें अगदीं वाईट आणि तें पाहून मला नुसतें वाईट वाटतें इतकेंच नव्हें, तर केव्हां केव्हां रडूं येतें. खरेंच या कामांत महाराजानीं फारच कडकपणा दाखविला. प्रि–ये आतां तूं त्याबद्दल मुळीं सुद्धां दुःख करूं नकोस. मी उद्यां महाराजांस जाऊन सांगतों — आणि -- सुंदरी —

संयो०–[ रागानें ] जरा आपण तोंड संभाळून आणि सभ्यपणानें बोलाल तर चांगलें होईल. आपल्या सारख्याला हे असलें भलते सलते शब्द उच्चारणें शोभत नाहीं.

कहर–मी तुला वाईट शब्द बोललों ? नाहीं, अगदीं चुकलों मी ! तुला राग आला असला तर मला क्षमा कर. मी तुला हात जोडतों, तुझ्या पाया पडतों. वल्लभे— तुला संकटांत आणि दुःखांत पाहिलें म्हणजे माझ्या मनाला अत्यंत दुःख होतें !

संयो०–तुम्ही हें कोणाला बोलतां याचा कांहीं तुह्माला विचार

आहे ? खबरदार असले घाणेरडे शद्ब पुन्हा उचारलेत तर ! आधीं तुम्ही येथें अशा वेळेला आलेत काय म्हणून ? व्हा चालते येथून ! थांबा, उद्यां सकाळीं मी बाबाना जाऊन विचारतें आणि त्यांच्या मुलीचा, त्यांच्या प्रीतीतल्या एका नीच मनुष्यानें असले हलकट शद्ब बोलून केलेला अपमान त्यांना सहन होतो कीं काय तें पहातें.

कहर [ हांसून ] जा महाराजांना जाऊन तूं खुशाल सांग ! ते तुझ्यावर रागावलेच आहेत. त्यांना तुझें सांगणें मुळींच खरें वाटणार नाहीं. पण तूं अशी रागावतेस काय म्हणून ? तुझ्या चांगल्या करतां तर हें मीं सांगतों.

संयो०—[ मनाशीं ] ज्यांची माझ्याकडे डोळा वर करून उचलून पाहण्याची शक्ति नव्हती, त्यानीं आतां माझ्या समोर येऊन निर्लज्यपणानें हवें तें बोलावें, आणि तें मीं निमूटपणें सोसावें, यापेक्षां मनाला जास्त दुःख देणारी स्थिति कोणची ? अशी वेळ वैरिणीला देखील येऊं नये. [ उघड ] काय हा तुम्ही चावटपणा मांडला आहे. शहाणें असाल तर येथून आपलें तोंड घेऊन चालते व्हाल. तुमच्या सारख्या मूर्खाला आणि उगीच आपली प्रौढी मिरविणाऱ्याला वरून जगांत मीं आपलें हांसें कधींहीं करून घेणार नाहीं. समजलात ?

कहर—मीं मूर्ख आणि तो पृथ्वीराज कायतो शहाणा आणि शूर होय ! त्याचा काय शूरपणा आहे तो मला माहीत आहे. एकदां त्याची आणि माझी गांठ पडूं दे म्हणजे दाखवीन त्याला माझ्या तरवारीचें पाणी कसें आहे तें !

संयो०—अहाहा — त्या मोहोबाच्या लढाईंत काय प्रकाश पडला तो सर्व जगाला माहित आहे पळून जाऊन दुसऱ्याचा आश्रय धरणें, हांजी हांजी करून त्याची मर्जी संपादणें, खोट्या नाट्या गोष्टी सांगून एखाद्याचे कान भरणें, दुसऱ्याला त्रास देणें, आणि बायकापुढें आपली प्रतिष्ठा सांगणें, हाचना आपला पराक्रम ! त्या वीरसिंहाच्या पायाची सुद्धां तुम्हाला सर येणार नाहीं.

कहर-[ रागानें ] त्याच्या पायाची सर मला येणार नाहीं असें ह्मणून माझा अपमान करतेस कां ? थांब मी आतां महाराजांना सांगून तुझी चांगली खोड मोडतों ! काय करूंग तो पृथ्वीराज जर येथें असतां, तर ज्याच्यावर तूं इतकी फिदा झाली आहेस, त्याला इथें तुझ्या समोर खालीं पाडून, त्याच्या उरावर पाय देऊन, सिंह कोण आणि भागूबाई कोण हें दाखविलें असतें ! पण काय करावें, तो माझ्या तावडींत सांपडत नाहीं; सांपडला कीं त्याला लंबा केलाच ! [ जरा जवळ जाऊन ] प्रिये, या शुष्क वादांत काय अर्थ आहे ? तूं एकदा महाराजांच्या हेतूप्रमाणें करण्याचें कबूल कर म्हणजे ते तुझ्यावरचा सर्व राग तेव्हांच सोडून देतील. मग मी महाराजांचें मोठें सैन्य घेऊन जाऊन त्याच्यावर स्वारी करीन आणि त्याला तुझ्यापुढें बांधून आणीन ! मग तुला या बहाद्दराचा पराक्रम दिसून येईल. राजकन्ये, हो म्हण एकदां ! उगीच आपल्या सकुमार शरिराला का पीडा देतेस ? सखे–[ जरा जास्त जवळ जातो ]

संयो०–[ रागानें ] व्हा दूर ? खबरदार पुढें आलांत तर ? [ मनाशीं ] कोणत्याही माणसाची खरी योग्यता न

ओळखतां त्याच्यावर मर्जी दाखविली म्हणजे तीं अशींच डोक्यावर चढतात ! माझी जर ही स्थिती तर, हे अधम बाबांच्या मर्जीतले म्हणून आपली हवी ती इच्छा तृप्त करून घेण्याकरितां गरिबावर काय गहजब उडवीतील कोण जाणें ! कोण आहे बाहेर ? काय, कोणीच ओ देत नाहीं ! हें पहा—आता—जर—( खंजीर दाखविते. )

कहर—[ चपापतो, पण हांसून ] अः असल्या शस्त्राना कोण भितो ? तूं किती जरी रागावलीस, आणि हवे तें केलेंस तरी त्याचा कांहीं एक उपयोग नाहीं. तुला जर या त्रासांतून सुटायचें असेल, तर त्याला आतां एकच उपाय; आणि तो माझ्याशीं लग्न लावण्याला कबूल होणें हाच ? नाहीं तर ब्रम्हदेव जरी वरून आला तरी त्याच्यानें महाराजांचा राग शांत करून तुझी सुटका होणार नाहीं. पाहूं वरें कोण तुझी सुटका करतो आणि रक्षण करतो तें ?

संयो०—माझें रक्षण करणारे निराळेच आहेत ! त्यांना जर माझी अशी दीन स्थिती आहे, माझी अशी हेलना होत आहे आणि तुमच्या सारख्या हलकट मनुष्या कडून छळणूक होत आहे असें कळते, तर त्यांनीं केव्हांच माझी सुटका केली असती, आणि तुम्हाला चांगलें प्रायःश्चितही दिलें असतें.

कहर या वीरासमोरे उभे राहण्याची त्या भागुबाईची काय छाती आहे. पण तूं आज मला अपमानकारक वाग्बाण मारले आहेस, त्याचें फळ तुला भोगावें लागेल. येऊंदे त्या तुझ्या प्रियकर पृथ्वीराजाला ? पाहतो तो

काय करतो ते ! तो इथें आला तर त्याला इथेंच दोन हात दाखवीन ? पण तसें करण्याची त्याच्या अंगात हिंमत कुठें आहे.

**संयो०**–बोलणें सोपें पण करणें कठिण आहे?

( इतक्यांत रूपसिंग आणि पृथ्वीराज वेषांतरानें येतात. पृथ्वीराज कहरकंठीरास खालीं पाडून त्यांच्या उरावर तरवार उपसून बसतो. )

**पृथ्वी**–कां परमार वंशांतील शूर वीर, दाखवा पाहूं तुमचे दोन हात ? हेच कां ते. आतां याचे चार होतील ?

**कहर**–अग राजकन्ये-मला–[ संयोगिता चकित होते. ]

**पृथ्वी**–चूप–बोललास तर ठार करीन ? [ तो भीतीनें डोळे मिटून पडतो. ]

**रूपसिंग**–[ संयोगितेच्या जंवळ जाऊन हलक्या स्वरानें ] बाईसाहेब, घाबरूं नका. आह्मी दुसरे कोणी नसून दिल्लीचे अधिपती जे पृथ्वीराज त्यांच्याकडून आपली सुटका करण्या करितां, आणि आपल्याला त्यांच्याकडे घेऊन जाण्या करितां आलों आहोंत ! आपले त्यांच्यावर जडलेलें निष्कपट आणि निर्मळ प्रेम, त्यांच्यामुळें आपल्याला सोसावा लागलेला त्रास आणि आपला झालेला छळ, वगैरे सर्व गोष्टी त्यांच्या कानांवर जाऊन त्यांनींच हा योजना केली ! सरकार स्वारी येथून दीड मजलेवर सैन्य घेऊन आली आहे. आपल्या येथें झालेला अपमान ऐकून त्यांना अतिशय संताप आला आहे. ते एकदम कनोज शहरावर हल्ला करणार होते, पण त्या योगानें आपल्यावर मात्र एखादें प्राणांत संकट ओढवेल ह्मणून आधीं गुप्तरितीनें आपली सुटका करावी-

आणि मग त्यांच्याशीं सामना करावा असा त्यांनीं विचार केला. आपण मनांत बिलकूल शंका आणूं नका. खालीं घोडे तयार आहेत; एक क्षण दवडाल तर सर्व मसलत फसेल, आणि आपल्यावर जास्त अनर्थ कोसळेल !

संयो०—( मनाशीं ) जरी मीं त्यांना मनानें वरिलें आहे, त्यांच्या भेटी करितां मी अगदीं उतावीळ झालें आहे, आणि या त्रासानें अगदीं गांजलें आहे, तरी माझ्या मनाची खात्री झाल्याशिवाय बाबांच्या नांवाला काळोखी लागेल आणि सर्वजण मला साहसी म्हणतील असें धाडस मी कसें करूं ? छे, मी माझ्या हातून असें कृत्य कधींही होऊं देणार नाहीं. त्यांची भेट न होतां माझा जरी अंत झाला तरी हरकत नाहीं. ( उघड ) तुह्मी हें काय मला साहस करायला सांगता ? ज्यांच्या योगानें माझी, त्यांची आणि बाबांची जगांत अपकीर्ति होईल असें कृत्य माझ्या स्वार्थाकरितां मी कधींही करणार नाहीं; मला माझें मन, ते आणि सगळें जग काय म्हणेल ?

रूप–[ मनाशीं ] आतां काय करावें ? इतकें करून शेवटीं मसलत फसते वाटतें ! [ उघड ] बाईसाहेब, हें साहस नव्हे आणि याच्या योगानें आपली अपकीर्तिही पण होणार नाहीं. फक्त कांहीं वेळ जनापवाद मात्र ऐकावा लागेल. पुढें कांहीं काळानें उभयतांतील वैमनस्य नाहींसें होऊन मनें स्वच्छ झालीं म्हणजे हेच जन आपल्या दृढनिश्चयाचीं गाणीं गातील ! सध्यां मात्र तसा सुदीन येण्याचा संभव नाहीं. म्हणून एवढ्या करितां सर्व जन्माचें मातेरें करून घेणें आणि त्रास सोसणें चांगलें नाहीं. जितकें आपलें मन त्यांच्या ठिकाणीं तल्लिन झालें आहे,

तितकेच त्यांचें आपलें ठिकाणीं जडलें आहे. हं बाईसाहेब आटपा लौकर. एकेक क्षण बिनमोलाचा जात आहे. शत्रूंच्या शहरांत आणि त्यांतून अशा ठिकाणीं आम्ही आपले जीव इतक्या धोक्यांत घातले एवढ्या वरूनही त्यांच्या प्रेमाची आपल्याला कल्पना होईल.

संयो०-( विचारांत स्तब्ध होते. ) छे, नाहींच उपयोगीं ! यांच्याबद्दल माझी खात्री होत नाहीं.

रूप०-बाईसाहेब विचार कसला करतां ? अहो ही विचार करण्याची वेळ नव्हे ! माझ्याविषयीं आपल्या मनांत शंका येते . तर ह्या पहा खुणा ? याच्यावरून तरी आपली खात्री होवो ! ( दोन आंगठ्या तिच्या हातावर टाकतो. )

संयो०-[ आंगठ्या पाहून आनंदीत होते. ]

रूप०-बाइसोहब, आतां झालीना खात्री ? त्या आपल्या तारेचाच मी भाऊ ! तिनेंच ही आंगठी दिली. तिचीच ही सर्व खटपट ! नाहींतर हें आपलें ठिकाण व हा गुप्त मार्ग आम्हाला कशानें कळला असता ; आणि दुसरी ती राजाधिराज दिल्लीपतीची मुख्य खुणेची आणि नेहमीं त्यांच्या हातांत घालण्याची ! आतां विलंब लावू नका .

संयो०-तारे शाबास ! तूं मला विसरली नाहींस ! तुझे उपकार कसे फेडूं ?

रूप०-हं: अटपा लवक.र . चला पुढें व्हा !

संयो०-बरें-बाबा; अशा रीतीनें मला प्रियकराकडे जाण्याचा प्रसंग बाबा तुम्ही कां बरें आणलात ? तुम्हा सर्वांना अयोग्य वाटण्याचा आणि राग येण्याचा हा प्रसंग आहे

खरा, पण त्याला मी काय करणार! अंतर्यामीं मी किती निर्मळ आणि शुद्धभावानें चालत आहे हें त्या एका परमेश्वरास माहीत! देव करो आणि आम्ही उभयतांनीं तुम्हाला प्रेमानें भेटण्याचा सुदीन लवकर येवो! बाबा ज्यांच्यावर आपला राग आहे, ज्यांचा आपल्याला इतका तिरस्कार वाटतो आणि ज्यांना मी वरल्यामुळें तुम्हाला अपमान झाला असें वाटत आहे, त्यांना वरून मी आपलें यश जगांत वाढविलें कीं कमी केलें, हें तुम्हाला मागून कळेल? पण यामुळें आईवर, त्या कुवरेवर आणि माझ्या सर्व चाकरमाणसांवर काय अनर्थ कोसळेल कोण जाणें! इकडे आईला होणारें दुःख आणि तिकडे प्रियकराचें प्रेम यांनीं माझी कशी त्रेधा करून टाकिली आहे. आई–आई–(रडूंलागते.)

रूप०–दुःख करूं नका. आतां फार वेळ झाला!

संयो०–देवावर, महाराजांच्या वचनावर आणि तुम्हावर विश्वास ठेऊन मी–याची लाज त्यांना! देवा मला जर फशी पाडशील तर मग मी एक क्षणभर देखील आपला प्राण ठेवणार नाहीं.

रूप–असे, दुष्ट विचार आपण मनांत मुळींच आणूं नयेत!

संयो०–अहो पण तो चांडाळ–

रूप–त्या विषयीं काळजी नको. त्या मूर्खाला येथेंच बांधून कोंडून ठेवलें ह्मणजे झालें! हें माझें वस्त्र पांघरा, आणि चला या अशा माझ्या मागून.

कहर–अग ए संयोगिते, मला सोडीव, मी महाराजास तूं पळून–

पृथ्वीराज–अरे मूर्खा कळलें तुझें शौर्य! तें तूं स्त्रियां-

पुढेंसच दाखवावेंस ! तूं मला इतक्यांत विसरलास वाटतें? हे तुझ्या अंगावरचे घाव अद्याप बुजाले नाहींत !

**कहर**– अरेरे आतां याला मीं ओळखलें. हा माझा शत्रू-

**रूप**–महा –( जीभ चावतो ) त्याचें आधीं तोंड बंद करा. बोळा घाला ! ( पृथ्वीराज त्याच्या तोंडांत देतो आणि त्याला बांधतो. )

**पृथ्वी॰**–वीर शिरोमणे, आतां आपलें रडण्याचें काय शौर्य असेल तें खुशाल दाखवा? हा नीचा–[ असें म्हणून लाथ मारतो. ]

**रूप**–चला–झालें–काम ! गुपचुप या.

**संयो॰**–अंबिके, सर्वस्वी माझा भार तुझ्यावर आहे.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थळ**–राजा जयचंदाचा महाल.

**पात्रें**–जयचंद आणि पद्मावती.

**पद्मावती**–( हात जोडून ) महाराज, याबद्दल मला कांहीं एक माहिती नाहीं. आपली अपकीर्ती होईल अशी गोष्ट मी कशी करूं देईन?

**जयचंद**–( रागानें ) याबद्दल तुला कांहीं एक माहित नाहीं म्हणतेस? काय हा तुझा धाडसपणा ! दुष्टे–

**पद्मावती**–हा विनाकारण मजवर आळ आहे !

**जय॰**–काय तुझ्यावर मी विनाकारण आळ घेतो? तुझ्या

संगती शिवाय ती कारटी येथून नाहींशी झाली नाहीं, हो गोष्ट मुळीं सुद्धां संभवत नाहीं. तुम्हाला माझ्या कीर्तिची, माझ्या मानापमानाची आणि माझ्या जिवाची तरी काय जरूर आहे. तुमच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी झाल्या म्हणजे झालें. आह्मी पुरुष महामूर्ख ह्मणून तुमच्या बाहेरच्या सौंदर्यास भुलून सर्वस्वी वागतों. खरोखर, जो तुमच्याशीं स्नेहानें, प्रेमानें आणि निष्कपटानें वागतो. त्याच्याशीं तुम्ही दगलबाजपणा करायला कधीं चुकत नाहीं. तुमचें मातृप्रेम कांहीं तरी घोंटाळा करील असें वाटलें होतें, म्हणूनच मीं आधीं बंदोबस्त केला होता; पण त्याचा परिणाम या थराला येऊन पोहोंचेल असें माझ्या स्वप्नीं सुद्धां आलें नव्हतें. धिःकार असो तुम्हा स्त्रीयांना!

धात्र०–( डोळ्यास पाणी आणून ) महाराज, आपल्या पायां शपथ, या पैकीं मला एक अक्षर सुद्धां माहित नाहीं. जें काय मला कळतें, तें प्रथम आपल्याच कडून! माझी खात्री आहे कीं, ताईच्या हातून आपल्याला जगांत खालीं पहावें लागेल असें कधींही होणार नाहीं.

य०–[ रागानें ] निर्लज्जे, त्या बेशरम कारटीची आणखी माझ्यापुढें तरफदारी करतेस काय? हाय, हाय, चांडाळणी, ज्या जयचंदाच्या यज्ञसमारंभांत छतीस देशच्या राजे लोकानीं, मोठमोठ्या सरदारांनीं आपलें हात बांधून, हुकमाप्रमाणें सर्व तऱ्हेची कामें केलीं; ज्याच्या दराऱ्यानें चहूंदेशचे राजे चळचळ कांपतात; ज्यांचें माझ्या ऐश्वर्य आणि प्रतापगर्वानें डोळे दिपून जातात, जे राजेलोक आपलीं शिरें माझ्या चरणावर

वाहून आपल्यास धन्य मानतात, ज्यानें आपल्या शौर्यानें सर्वांस पादाक्रांत करून सार्वभौमत्व मिरविलें, ज्याचें शीर कोणापुढेंही नम्र झालें नाहीं; त्या जयचंदाला या निर्लज्ज कारटीनें माझ्या हाडवैऱ्यास वरून त्या सर्व राजेलोकांसमक्ष मला खालीं पहावयाला लाविलें. यापेक्षां आणखी मानखंडना करण्याची बाकी ती कोणती राहिली; आणि आतां तर त्याच्याकडे पळून जाऊन या जयचंदाच्या दुष्कीर्तिचा झेंडा सर्व जगभर नाचविला!! दुष्टे, आतां हेच राजेलोक माझा कसा अपमान करतील, याची तुझ्या मनांत कल्पना तरी आहे काय ? ज्याच्यावर तुह्मी एकदा फिदा होता, त्या तुमच्या प्रेमपात्राच्या प्राप्ती करितां तुह्मी नाहीं तीं अघोर कृत्यें करण्याला कधीं चुकणार नाहीं. तुम्हाला मग आपल्या कुलाची, शिलाची आणि आपल्या पूर्वजांच्या निर्मळ कीर्तीची मुळीं सुद्धां चाड नसते. तुमच्या प्रेमाशिवाय तुम्हाला मग जगांत कांहीं एक दिसत नाहीं. बरें तें तुमचें प्रेम तरी निर्मळ असें अखंडित चालतें काय ? नाहीं. आतां एक, घटकेनें दुसरा, मग तिसरा, असें आकाशांतील ढगांवर सूर्याची किरणें पडल्यामुळें त्याचे जसे रंग बदलतात; वायू वेगानें समुद्रावर जशा लहान मोठ्या लाटा येतात, तशा तुमच्या प्रीतिसमुद्रावर क्षणोक्षणीं बदलणाऱ्या लहरी येतात! स्थीर असें तुमचें कांहींच नाहीं. अशा ज्या तुह्मी चंचल, साहसी आणि कपटी स्त्रिया, त्यांचें मुखावलोकनही करणें नको! हे अभाग्या जयचंदा, आजपर्यंत जें तूं आपल्या पराक्रमानें उज्वल कीर्ती-

मंदिर उभारून ठेवलेंस, तें तुझ्या कारटीनें आज रसातळास मिळविलें. तुझ्या तोंडाला काळें फासलें. धिःकार असो या मायावी कुलटांना, त्या कारटीला, आणि तिला जन्म देणाऱ्या आम्हा पितरांना ? मीच महामूर्ख, मीच त्या पितृवात्सल्याच्या मोह जालांत त्या वेळेस फसलों, आणि आतां सर्वस्वी तोंडघशीं पडलों. त्याचवेळीं तिचे जर मीं दोन तुकडे करून टाकले असते तर, आज जगाला काळे तोंड दाखविण्याचा हा दुर्धर प्रसंग टळला असतां ! अरेरे–काय करूं. आतां हें काळें तोंड मी जगाला कसें दाखवूं ? "दुहिता भली न एक, दुहिता भली न एक" असें जें म्हणतात तें अगदीं अक्षरशः खरें ! नको, नको, हा अपयशाचा डांगोरा पिटवून घेण्यापेक्षां, हे राज्य नको, वैभव नको, स्त्री नको, पुत्र नको, हा जीव नको आणि कांहीं नको–याहून मरण फार फार बरें !–अगं दुष्टे काय हा प्रसंग आणलास ! ( तरवा उपसतो )

**पद्मावती**–( घाबरून पुढें होऊन ) महाराज, जरा शांत व्हा !

**जय०**-[ तिला ढकलून देऊन ] अगं आतां हा जयचंद्र त्या कारटीच्या आणि त्या नीच पृथ्वीराजाच्या रक्तांत जेव्हां ही तरवार बुडवील तेव्हांच शांत होईल.

( इतक्यांत कहरकंठीर वालुकरायाचें शीर आणि पत्र घेऊन येतो. )

**कहर**–[ मनाशीं ] महराजांना हें आतांच सांगावें कीं कसें ? आतांच सांगावें ! ( जवळ जाऊन शीर पुढें ठेवतो । आणि पत्र देतो )

**जय**–कोणाचं हें पत्र आणि हे काय ! [शीर पाहून मुर्च्छित पडतो]

( कहरकंठीर आणि पद्मावती त्यास सावध करतात )

**पद्मा०**–[ डोळयास पदर लावते ] भाऊजी–काय ही आपली स्थिती झाली. दुष्टांनीं आपला अवचित कसा घात केला ! देवा, देवा, आणखी आम्हांवर काय काय संकटें येणार कोण जाणें !

**जयचंद**–( सावध होऊन दुःखानें ) वालुकराया, शेवटीं तूं त्या दुष्टाच्या हातानें बळी पडलास ना ? ज्याप्रमाणें तूं अनेक वेळां युद्धांत यश घेऊन आलास त्याचप्रमाणें आतांही शत्रूची खोड मोडून येशील अशी मला मोठी उमेद होती; ती आतां पार नाहींशी झाली. त्या नीचांनीं खचित तुझ्यावर अकस्मात घाला घातला असेल, नाहीं तर तुझ्याशीं लढाई करून यश घेऊन जाण्याची त्यांची बिलकूल छाती झाली नसती ! ( रागानें ) पण बरोबरचे मोठमोठे वीर, सरदार काय करीत होते ?

**कहर**–आपल्या सर्व सैन्याचा पराभव झाला आणि ते आतां परतले आहे.

**जय**–काय ? सर्वजण शत्रूला पाठ दाखवून परतले ! त्या सर्व सैन्यामध्यें त्या नीचाचा सूड घेणारा एकही वीर नाहीं ? सर्वांच्या बाहूतील शौर्य नष्ट झालें काय ? धिःकार असो तुम्हाला, षढांनों ? माझ्या वीर बंधु वालुकरायाला शशत्रूच्या तोंडीं देऊन तुम्ही भागूबाईसारखे जीव बचावून पळून येता ! या जयचंदाशीं गांठ आहे हें तुम्ही विसरलांत वाटतें ! या तुम्ही येथें परत कीं, प्रत्येकाचा शिरच्छेदच करतों.

**कहर**–महाराज मी त्या दोघांस पकडून आणण्या करितां चहूंकडे स्वाऱ्यांच्या टोळ्या पाठविल्या आहेत. फार करून तो आपल्या हातीं लवकरच सांपडेल. महाराज, मी

जेव्हां तेथें कसा काय बंदोबस्त आहे हें पाहण्यास रात्रीं गेलों होतों, तेव्हां त्या तेथें एकटयाच होत्या ! त्यांची दासी ती कुवर देखील तेथें नव्हती ?

**जय**–ती कुठें गेली होती !

**कहर**–तिला त्यांनीं राणी साहेबाकडे गुप्त रितीनें कांहीं निरोप सांगून पाठविली होती. तिला रातीं गस्त घालणाऱ्या शिपायांनीं इकडे येत असतां पकडलें ! तिला जेव्हां चांगलें चवदावें रत्न दाखविलें, तेव्हां ती कबूल झाली. भली बिलंदर आहे ती. पण त्या कुठें गेल्या तें सांग असें विचारलें तर तें मला माहित नाहीं, मी राणी साहेबाकडे जात होते इतकेंच सांगते. तिला मीं खालीं आणली आहे. पाहिजे असेल तर समक्ष बोलावतो. महाराज कोणी तरी भेदी सामिल असल्या शिवाय किल्ल्यांत त्या चोरांचा गुप्त रितीनें प्रवेश झाला नाहीं.

**जय**०–जा, त्या रांडेला घेऊन या पाहूं ?

[ कहरकंठीर कुवर दासीस घेऊन येयो. ]

काय ग ऐ बटिके. संयोगिता कुठें गेली ? खरें बोललिस तर जिवंत सुटशील ?

**कुवर**-महाराज, ताईसाहेबांनीं मला राणी साहेबास बोलावण्यास पाठविलें होतें. मागें काय झालें तें मला माहित नाहीं ?

**जय**०–तुला माहित नाहींना ? बस्स चहूंकडे फितूर माजला आहे फितूर ! [ पद्मावती कडे पाहून ] काय, तुम्हाला या पैकीं कांहींच माहित नाहीं ना ? मग हें काय ? ऐका, ऐका ही काय सांगते तें ऐका ? झालें, प्रत्यक्ष मातोश्रीची असल्या गोष्टीला संमती मग काय पाहिजे ?

माझी पोटची पोर आणि प्रत्यक्ष ही स्त्री माझ्या कुलाला कलंक लावयला तयार झाल्यावर मग माझी जगांत फटफजिती होण्याला उशीर किती ? दुष्टे, तूं इतकी कृत्या असशील असें मला वाटलें नव्हतें ? या कृत्यांत माझा पाठिराखा बंधू मात्र फुकट मारला गेला ! माझा उजवा हात गळून पडला ! माझें वीररत्न हरपलें. हाय, हाय, बंधुराया, तुला मी आतां कोठें पाहूं ? या अभाग्याला आतां तूं कशाचा भेटणार ? अशीच कारे आतां तुझी माझी भेट ! [ शिराला कवटाळतो ].

पद्मा०–( रडून ) महाराज दुःख करूं नका ! जरा—

जय०–[ आवेशानें ] दुष्टे, नीघ माझ्या समोरून ! मला तुझें तोंड पहाणें नको ! कहरकंठीर जा या दुष्टेला किल्ल्यांत कोंडून ठेव आणि त्या रांडेचा कोतवालाला सांगून शिरच्छेद कर ? खबरदार माझ्या हुकमाशिवाय तिकडे कोणी गेलें तर !

पद्मा०–( शोकविव्हल होऊन ) महाराज–काय हा मजवर गहजब ! आह्मी सर्वस्वी निरपराधी आहोंत ? ती दासीच सांगतेना कीं, ती मजकडे निरोप घेऊन येत होती. मध्येंच तिला शिपायांनीं पकडलें ! तिची माझी भेट सुद्धां झाली नाहीं. महाराज अद्यापी आपली खात्री होत नसेल आणि आपला रागही शांत होत नसेल तर आपल्या हातानें माझा शिरच्छेद करा. पण विना-कारण नाहीं तीं दूषणें देऊन वाग्बाण मारूं नका !

जय०–त्या चोराला, आणि त्या कुलटेला दोघांना पकडून आणीन आणि मग सर्वांचा समाचार घेईन. आतांच

तुझ्या अपवित्र रक्तानें मी आपले हात विटळीत नाहीं. चल नीच काळें कर !

पद्मावती–[ रडत रडत ] देवा तुला डोळे ! महाराज— [ जाऊं लागते ]

कहर–[ मनाशीं ] तिला आतां पकडून आणली कीं मग ती कुठें जातें ! माझीच ती !

[ कहरकंठीर, पद्मावती आणि कुवरदासी जातात ]

जय–[ हातांत पत्र घेऊन रागानें ] " आपला बंधू आपल्या तजविजी करितां पुढें पाठविला आहे, आपणही आतां तयारी करावी ! " अरे चोरा, हा तूं यज्ञ समारंभाचा मला नजराणा पाठविलास काय ? षंढा, माझ्या कीर्तीवर दरोडा घालून, माझ्या वालुकरायाचा एकदम छापा घालून घात करून, शेवटीं आपला पराक्रम, आपली प्रौढी, आणि आपला पुरुषार्थ, अशीं पत्रें लिहून दाखवितोस आणि माझ्या काळजाला घरे पाडतोस काय ? पण या सर्व गोष्टींचा सूड घेतल्या शिवाय हा जयचंद कधींही राहणार नाहीं. बाबा, तूं मात्र खरा वीर आईबापाच्या पोटी येऊन, आणि आपल्या पराक्रमाची शिकस्त करून धारातीर्थी देह ठेवलास, आणि आपल्या पूर्वजाना जगांत धन्य करून सोडलेस ! तूं मोठा भाग्यवान खरा म्हणून हा दुष्कीर्तीचा वांटा तुझ्या वांटयास आला नाहीं. मी अभागी मात्र, हें दुःसह दुःख सोसण्यास अद्यापि कसा राहिलों आहे कोण जाणें ! [ अमळ स्तब्ध होऊन ] नाहीं. आतां मला माझ्या वैऱ्याचा सूड घेण्याकरितां जगलेंच पाहिजे. त्या पृथ्वीराजाचा सूड घेण्याशिवाय मला आतां जगांत दुसरें कांहींच

कर्तव्य नाहीं. माझ्या बंधूच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबाबरोबर शेंकडो वीरांच्या रक्ताचे पाट वाहवीन, त्यांत या तरवारीला शेंकडो वेळां बुडवीन आणि शेवटीं त्याच्या प्राणाची पूर्णाहुति देईन तेव्हांच हा महारणयज्ञ संपवीन ! दुष्टांनों, तुमचें राज्य नष्ट होऊन, तुमची धुळधाण झाल्यामुळें तुमच्या स्त्रिया, तुमची मुलें माणसें, तुमच्या देखत जेव्हां देशोधडीला लागतील, धाय धाय रडत जंगलांतून हिंडतील आणि तुमच्या समक्ष जेव्हां पटापट सर्वस्वी नागावल्यामुळें प्राण सोडतील ; तेव्हां तुम्हाला या जयचंदाच्या वैराग्निचा अअनुभव येईल. दुष्टा, या माझ्या हृदयांत पेटलेला क्रोधाग्नी चव्हाण वंशांतील वीरस्त्रियांच्या, त्यांचें सौभाग्य नष्ट झाल्यामुळें क्षणोक्षणीं त्यांच्या नेत्रांतून पडणाऱ्या अश्रुजलानें मात्र शांत होईल. शोकाकूल झाल्यानें त्यांच्या आक्रोशानें हें आकाश, तें रणमंडळ जेव्हां गजबजून जाऊन इतरांचीं अंतःकरणें फोडून टाकील, त्या वेळेस मला मोठा आनंद होईल. हें सर्व शेवटास नेण्याकरितां माझें सर्व राज्य आणि सैन्य जरी नष्ट झालें तरी मला त्याची बिलकूल पर्वा नाहीं ! हे स्वर्गस्थ देवानों, या जयचंदावर प्रसन्न होऊन आपल्या प्रसादाच्या योगानें याच्या अंगांत प्रचंड शक्ती येऊंद्या ? हे माझ्या परम पूज्य पूर्वजांनों, या तुमच्या लेंकरांवर आशिर्वादाची वृष्टी करा ! हे भूत पिशाच्यादि गणांनों, याच्या अंगांत संचार करून याच्या हातून रणांत अद्वितीय कृत्य करावा ? हे अष्ट दिक्पालानों तुह्माला साक्षी ठेवून केलेली ही माझी प्रतिज्ञा तुम्ही

शेवटास न्या ? नीचानों तुमच्या आयुषाच्या दोऱ्या या जयचंद आपल्या तरवारीनें कशा तडातड तोडून टाकतो तें पहा ? मला आतां " सूड सूड " या शिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं; कोणत्याही रितीनें मी आपला सूड उगवून घेऊन आपल्या आत्म्याची शांती करीन, तरच हा जयचंद जन्मास आल्याचें सार्थक ? सूड, सूड, सूड दुसरें कांहीं नाहीं.

( असें म्हणून शिर घेऊन निघून जातो. )

पडदा पडतो.

**अंक २ रा समाप्त.**

---

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**–दिल्ली शहरा बाहेरच्या बागेंतील मधुमालतीचा मंडप.

**पात्रें**–[ पृथ्वीराज आणि रूपसिंग येतात. ]

**पृथ्वीराज**–( आनंदानें ) रूपसिंगजी, तुह्मी आपल्या वचनाप्रमाणें अक्षरशः चालतात. तुमच्या विषयीं आमच्या मनांत ज्या प्रथम शंका आल्या होत्या, त्या केवळ तुह्मी कनोज शहराचे राहणारे म्हणून; त्या वेळेचा प्रसंगही तसाच असल्यामुळें तशा शंका येणें अगदीं सहाजिक होतें. आतां तुम्ही मला माझ्या प्राणांहून प्रिय आहांत ! तुमच्या सारखीं विश्वासूक आणि खरीं माणसें दैव योगानेंच मिळतात; आणि तुमच्या सारख्यांच्या एकनिष्ठपणानेंच हा पृथ्वीराज नेहमीं विजयी होतो. हा घ्या मोत्याचा कंठा आणि चौकडा ? ( कंठा काढून त्याच्या गळयांत घालतो ) तुमच्या कामगिरीबद्दल हें बक्षिस म्हणजे कांहींच नव्हे !

**रूप०**–महाराज, नको मला हें बक्षिस ? मी बक्षिस मागून घ्यावें अशी वेळ अद्यापि आली नाहीं. ती जेव्हां येईल तेव्हां मीच बक्षिस मागून घेईन ? सरकार, प्रामाणिकपणा आणि सत्यपणा हे दोन मनुष्याजवळ दागिने असले म्हणजे झालें. या दोन गोष्टीनीं मी

महाराजांच्या पूर्ण कसोटीला उतरल्यानें सध्यां जो मला आनंद झाला आहे, तो हे दागिनें घालून होणाऱ्याआनंदा पेक्षां फार मोठा आहे.

पृथ्वी०–त्या तुमच्या दागिन्यांना तर मोलच नाहीं. पण हे तुम्ही माझ्या आनंदोत्सवाची प्रथम खूण म्हणून घेतलेच पाहिजेत. आणखी ही कट्यार तुम्ही आपल्या जवळ सतत बाळगा. कोणत्याही वेळेस तुमच्यावर संकट आलें आणि खूण म्हणून जर ही तुम्ही मजकडे पाठविलीत, तर तुम्ही कोठें आणि कसल्याही संकटांत असला तरी हा पृथ्वीराज त्यांतून तुमची सुटका करील. समजलांत ?

रूप०–याच्या योगानें आतां मी निर्भय झालों ! या सर्व लाभापेक्षां महाराजांच्या चरणाचा आश्रय मिळून पुन्हा सेवा करण्याचा योग आला, हा लाभ फार अधिक आहे. बरें पण सरकार, स्वारी शहरांत केव्हां चलणार ? येथें येऊन बरेच दिवस झाले.

पृथ्वी०–रूपसिंगजी, मी त्याच विचारांत आहे.

रूप०-शहरांत किशनकुवर बाईसाहेब, आणि आपल्या दुसऱ्या राणी साहेब आहेत, तेव्हां–

पृथ्वी०–होय तें लचांड आहे खरें ! बरें पाहून घेऊं पुढच्या पुढें ? रूपसिंगजी आज तिकडला कसा काय रंगराग आहे तो मी पहाणार आहे.

रूप–महाराज, आज चार पांच दिवसांत त्यांची वृत्ती अगदीं चमत्कारिक झाली आहे. "महाराजांची भेट केव्हां होईल" याशिवाय त्यांचें दुसरें बोलणें नसतें ! परंतु महाराजांच्या आज्ञेबाहेर मुळींच चालता येत नसल्यानें

मला इकडे आड आणि तिकडे विहीर असें झालें आहे! त्यांना आजपर्यंत दुग्धांत ठेविल्यामुळें त्यांच्या मनाची स्थिति कशी आहे हें त्यांच्या निस्तेज आणि उदासवाण्या चेहेऱ्यावर स्पष्ट दिसत आहे. हें महाराजांच्याही लक्षांत आल्यावांचून राहिलें नसेल; तेव्हां आतां महाराजांनीं त्यांचा अंत पाहूं नये.

पृथ्वी०-रूपसिंगजी तुमच्या धनिनीच्या दुःखाचा आजचा हा शेवटचाच दिवस असें समजा! मी आतां तिकडेच जातों. तुम्हीही अमळशानें तिकडे या.

रूप० आज्ञा सरकार! (पृथ्वीराज जातो) (मनाशीं) सरकारस्वारी जवळ असली कीं, माझ्या आंगाचा अगदीं थरकांप होऊन जातो. माझा ऊर धड धड उडूं लागतो; आणि माझी चित्तवृत्ती पूर्वीच्या गोष्टीच्या स्मरणानें अगदीं चंचल होऊन जाते. महाराजापुढें सर्व अपराध कबूल करून व्हावं कां मोकळं! ह्मणजे मनाला रात्रंदिवस लागलेली जाचणी तरी कमी होईल! महाराज, सध्यां जे आपण माझ्याशीं मोठ्या प्रेमानें बोलतां, तुला एक क्षणभर सुद्धां विसरणार नाहीं म्हणून ह्मणतां, मोठमोठ्या देणग्या देतां; हें सर्व मग पूर्वीप्रमाणें राहील का? छे, कशाला मग ती आशा पाहिजे! पूर्वीचे ते दिवस गेले, आणि त्या बरोबर तें सौख्यही गेलें! आतां माझ्या आयुष्याचे दिवस असेच जायचे! बाई—सा—

(इतक्यांत हाडुरीराय येतो, रूपसिंग त्याला पाहून चपापतो.)

हाडुरी०—कां रूपसिंगजी, आज तुम्ही एकटेसे! तुम्ही म्हटलें म्हणजे महाराजांच्या बरोबर नेहमीं असायचे!

रूप०-[ चकित मुद्रेनें ] उगीच आपला तुमच्या बागेची शोभा पहात होतो.

हाहुरी०-असें काय तुमच्या कनोज शहरांपेक्षां कांहीं ही आमची बाग सुंदर नसेल ! उगीच अफाट आहे इतकेंच

रूप०-बरें सरकारस्वारी कोणीकडे गेली ?

हाहुरी०-त्या तिकडच्या बाजूनें गेली, तेव्हां महालांत गेली असें वाटतें.

रूप-असें काय ? तर मी आतां तिकडे जातों ! मग केव्हां तरी बोलत बसूं स्वस्थ पणें. ( जाऊं लागतो )

हाहुरी-( त्याचा हात धरतो, तो रूपसिंग आपला हात झटकन ओढून घेतो ) अहो, इतकी घाई का ? अमच्यावर थोडीशी मेहेरेनजर ठेवीत जा !

रूप-आपल्या सारख्या मोठ्या सरदारांची पाहिजे.

हाहुरी-आपण पडलांत प्रीतीतलीं माणसें आणि त्यांतून नाजूक कामाचीं म्हणून म्हणतों !

रूप-छे, छे, असें कांहीं नाहीं ! येतों मी-

हाहुरी-थांबा ना जरासे.

रूप-वेळ नाहीं—नाहीं तर ( लगबगीनें जातो )

हाहुरी-[ गेलासें पाहून ] पहा, त्याला माझ्या पुढून जाण्याची कोण घाई झाली होती ! मला पाहिल्या बरोबर घाबरला किती ! छावणींत आल्यापासून पहातों तों याची तऱ्हा कांहीं वेगळीच ! राहणें देखील अगदीं तुटकपणाचें ! या गृहस्थाचा चेहरा माझ्या ओळखीचा दिसतो; आणि तों मी दिल्लींतच पाहिला असावा असें वाटतें ! पण हा म्हणतों कीं, मी कनोजचा राहणारा ! याच्या तोंडचें मी येण्याचे अगोदरचे जे शेवटचे शब्द

ऐकलें, त्यावरून माझ्या मनांत शंका येते ! नाहींतर ते शद्ब याच्या तोंडून तसे निघाले नसते ! इथें कांहीं तरी गौडबंगाळ आहे खास ! कदाचित् जयचंदानें या गुप्त वेषानें महाराजाना दगा करण्याकरितां एखादा हेर तर पाठविला नसेल ? छे, असें उपयोगीं नाहीं. याचा पत्ता लाविलाच पाहिजे. यानें राजकन्या महाराजाना मिळवून दिली ह्मणून याच्यावर त्यांची अत्यंत मर्जी आहे आणि तो नेहमीं महाराजा जवळ असतो, तेव्हां हें काम मोठ्या सावधगिरीनें आणि शहाणपणानें केलें पाहिजे. त्याला एखाद्या कचाटच्यांत पकडला कीं, मग आलेंच सगळें बाहेर ! बरें आहे रूपसिंगजी ! [ मिशांवर ताव देत जातो ]

---

## प्रवेश २ रा.

स्थळ—बागेंतील पृथ्वीराजाचा महाल.

**पात्रें**—( संयोगिता आपल्याशीं विचार करीत बिछान्यावर पडली आहे. )

**संयोगिता**—( आपल्याशीं ) तेथें पोंहचल्यावर आपल्याला आपली तारा भेटेल, असें रूपसिंगजी रोज म्हणतात. येथें आल्याला बरेच दिवस झाले पण अद्याप तिचा पत्ता नाहीं. कदाचित् तिला ही बातमी कळली नसेल. नाहीं तर—मी आलेली कळल्यावर ती क्षणभर देखिल मला भेटल्यावाचून रहाणार नाहीं. बरें, ज्यांच्या

वचनावर विश्वास ठेवून आणि ज्या आशेनें मी हें साहस केलें तिकडीलही भेट अद्याप होत नाहीं; रोज आपली पुढच्या मुक्कामाला भेट होईल असें रूपसिंग सांगतात; आणि स्वारी पुढच्या मुक्कामाला का गेली, याबद्दल कांहीं तरी त्यांची आपली रोज नवी सबब असते; पण अशी ही चाळवणी ते कां करतात हें मला मुळींच कळत नाहीं. यावरून या सज्जनसिंगजी विषयीं मला संशय येतो. कारण असलें राजतेज एखाद्या सामान्य सरदारामध्यें कुठलें? याविषयीं मी बराच विचार करते पण माझ्या मनाची खात्री होत नाहीं. हे सज्जनसिंग माझ्या दृष्टीस पडले कीं, माझ्या मनाचा अगदीं गोंधळ उडून जातो. कदाचित् महाराज स्वतां माझी परिक्षा तर पहात नसतील? छे, तशी गोष्ट त्यांच्या हातून कधींच घडणार नाहीं. माझ्या मनांत अशी गोष्ट येणें हेंच मुळीं वाईट! महाराजांचें मन अत्यंत कोमळ आहे. पण आताशा पहाते तों त्यांची आणि रूपसिंगजीची सारखीं खलबतें चाललेलीं असतात. आतां ते रूपसिंगजी इकडे आले कीं, मी आज याची शहानिशा करून घेतल्या शिवाय राहणार नाहीं. माझ्या या कृत्याचा मला पश्चात्ताप होईल आणि मी बाबांच्या अपकीर्तिला कारण होईल असा प्रसंग देवा आणूं नकोस! कदाचित् याही ठिकाणीं जर माझ्या दुर्दैवानें उलट खाऊन तसा प्रसंग आलाच, तर मग तूं एकक्षणभर देखील या चांडाळणीला जगांत ठेवूं नकोस. महाराज, या थराला गोष्ट आपण कधींही येऊं देणार नाहीं. आपलें अंतःकरण फार निर्मळ आणि कोमळ

आहे असें मला तारा सांगत असें तें खोटें नाहीं का होणार ? छे, ही आपली उगीच माझ्या मनाची शंका ! आणि याच शंकांनीं माझें मन थाऱ्यावर नाहींसें झालें आहे. या मेलीच्या नशिबी काय आहे कोण जाणें. आईची आणि त्या कुवरची तिकडे काय बरें अवस्था झाली असेल ! कोण त्या दुर्दैवी ! त्यांच्या दुःखाचा शेवट माझ्याहातून केव्हां होईल तो होवो, पण सध्यां मात्र त्यांच्या दुःखाला मी कारण झालें आहे खरी ! आई,—वल्लभा—( असें म्हणून झोंपीं जाते ).

( इतक्यांत पृथ्वीराज येतो. )

पृथ्वी—( ती निजलीसे पाहून ) आजपर्यंत मी ओळख न देतां संशयांत ठेऊन, या सुंदरीच्या मनाला अतिशय त्रास दिला ही मोठी चूक केली. मनाच्या अंतस्थ दुःखद स्थितीनें आणि औदासिन्यानें आपली दाट छाया पसरून हिचा उल्हास नाहींसा करून हिचें सौंदर्य-पुष्प कोमेजून टाकलें. काय हा औदासिन्याचा आणि चिंतेचा तडाखा ! अरे, जिनें तुझ्या रूपावर आणि गुणावर लुब्ध होऊन, प्रत्यक्ष आपल्या बापाच्या क्रोधास न जुमानून तुझ्या करितां बंदिवासासारखे हाल भोगले, तुझ्या नुसत्या वचनावर विश्वास ठेविला; तर या पेक्षां आणखी तिनें आपल्या दृढनिश्चयाची साक्ष ती कोणती पटवावी ? वेड्या, तिला एकदम ओळख देऊन, आपली अर्धांगी करण्याची आणि आनंद समुद्रांत पोहण्याची दवयोगानें उत्तम संधि आली असतां ती तूं आपल्या हातानें घालवून उगीच तिला विरहदुःख भोगायला लावीत आहेस; या सारखा

पृथ्वीराजा, आणखी तुझा वेडेपणा तो कोणता! सर्व भरत खंडाचें भूषण, असें हें अपूर्व स्त्री रत्न मिळणें आधीं कठीण आहे. तें तुझ्या पूर्वपुण्याईनें तुला अनायसें मिळालें असतां, त्याचा उपभोग न घेतां फुकट का घालवतोस? ज्या कनोज शहरांत हें अमोल रत्न निर्माण झालें त्या कनोज शहराचें; ज्याच्या पोटीं जन्मास आलें त्या जयचंदाचें, आणि माझें पूर्ण पुण्यच उदयाला आलें म्हणायाचें? या रत्नाच्या अमोल गुणांची परिक्षा त्या नीचाला कशी होणार? त्याला कांच आणि हिरकणी दोन्ही सारखीच! पृथ्वीराजा, तुझ्या सारखा भाग्यवान या जगांत दुसरा कोणी नाहीं, धन्य, धन्य तूं? परमेश्वरा, मला याचा उपभोग पुष्कळ वर्षें यथेच्छ घेऊं दे. तुझ्या मनांतून जेव्हां आमची ताटातूट करायची असेल, तेव्हां ती एकदम कर, पण एक क्षणभरही विहरदुःख भोगण्याचा प्रसंग आणूं नकोस हीच तुला माझी हात जोडून विनंती आहे. प्रिये–[ ती झोंपेंत बरळते. ]

संयो०-[ झोंपेंत ] अरे–हो–मागें. महाराजास सांगून तुला शिक्षा करवीन. नीचा–मी येथें–एकटी, निराधार–असें समजून–

पृथ्वी०–[ मागें सरकून आश्चर्यानें ] ही हे शद्ब कोणाला उद्देशून बोलते बरें? कोण अधम हिचा छळ करीत असतो. हें जर मला समजेल तर त्याचे आतां शतशः तुकडे करीन. सखे–तूं आपल्याला एकटी–निराधार, असें हा पृथ्वीराज तुझ्या रक्षणा करितां रात्रंदिवस तयार असतां आपल्याला कां समजसेस?

संयो०–अरे तूं महाराजांचा सरदार–त्याच्या फार मर्जीतला–म्हणून असें करायाला तूं धजतोस काय ?

पृथ्वी०–[ जरा रागानें ] तो दुष्ट रूपसिंग तर नसेल ? कोणाच्या मनांत कोणत्यावेळीं काय येईल हें कोण सांगणार ? आंत एक आणि बाहेर एक असें दाखविणारे कार्य साधू काय जगांत थोडे आहेत ?

संयो०–अधमा सज्जनसिंगा, शेवटीं माझ्या अंगावर हात टाकलास काय ? तर हें घे तुला त्या बद्दल बक्षिस ! [ असें ह्मणून हात आपटते आणि जागी होते. ]

पृथ्वी०–( आनंदानें ) वा, तर मग प्रिये, हा सज्जनसिंग खरोखरीच तुझ्या शिक्षेस पात्र आहे. आतां याला तुझ्या प्रेमालिंगन पाशानें बांधून चांगली शिक्षा कर.

संयो०–( उठून )हा काय बाई चमत्कार ! मी स्वप्नांत हें काय पाहिलें. तो सज्जनसिंग माझ्या स्वप्नांत येऊन काय म्हणून माझा असा छळ करीत होता ? आज माझ्या मनांत नुसता विचार आला त्याचा हा इतका परिणाम नको, त्याचें पुन्हा मला तोंड पहाणें नको ! आज माझ्या मनाला हुरहुर आणि भीति कां बरें वाटते ! [ कावरी बावरी होऊन ] रूपसिंग–अहो रूपसिंग–

( इतक्यात पृथ्वीराज पुढें येतो. )

पृथ्वी०–काय हुकूम आहे ? आपल्या सेवेला हा दास तयार आहे ?

संयो०–( भीतिनें चपापते ) अग आई आतां मी काय करूं ! या वेळपर्यंत मी जें स्वप्नांत पाहिलें तें आतां प्रत्यक्ष अनुभवास येते कीं काय ? देवा आतां अब्रु रक्षण

करणार तूंच आहेस ! ( उठते ) अहो, रूपसिंग कुठें आहेत ?

पृथ्वी०–ते दुसऱ्या कांहीं कामाला गेले आहेत. आपल्याला उद्यां भेटतील ?

सज्जन–काहो तुम्ही, ते तुमचे स्नेही रूपसिंग महाराजांची स्वारी पुढच्या मुकामाला भेटेल ह्मणून रोज सांगता, तो तुमचा पुढचा मुक्काम संपणार केव्हां ?

पृथ्वी०–उद्यां महाराजाची खास भेट होईल ! कदाचित् स्वारी परत मागें फिरून आजही येथें येईल ! महाराजांचा नेम काय ? जशी लहर लागेल तसें करतात. आतांच्या आतां देखील स्वारी येथें येणार नाहीं हे तरी कोणी सांगावें ? पण त्यांत काय अर्थ आहे. आपण उगीच त्रास भोगता !

संयो०–( चकित होऊन ) म्हणजे तुम्ही हें काय बोलतां ! या तुमच्या भाषणाचा अर्थ समजत नाहीं.

पृथ्वी०–आपण खरोखरच अविचार केलात ! तेथें जाऊन उगीच आगींत मात्र पडाल !

संयो०–यावरून मला संशय येतो. यांत तुमचा कांहीं तरी हेतू आहे.

पृथ्वी–हेतू फक्त तुमच्या कल्याणाचा. छे, तुह्माला आणखी यापुढें संशयांत ठेवूं कशाला ! अहो महाराजांचें आपल्यावर कांहीं खरें प्रेम नाहीं; आणि तें राहणार कसें ? बोलून चालून आपण पडला त्यांच्या शत्रूंची मुलगी ! जयचंद महाराजांनीं त्यांचा कसा अपमान केला आहे हें सर्व जगाला माहीत आहे, मग आपल्याला वरून उगीच लढाईचें कारण ते काय ह्मणून उपस्थित करून

घेतील. महाराजास तीन चार राण्या आहेत, त्यांच्या मुठींत महाराज असतात ! शिवाय ते पडले विलासी, रंगेल आणि लहरी. अशा मनुष्याचें प्रेम तें काय, आणि त्यांच्या वचनाचा खरेपणा तो काय ? महाराजांनीं ही तुमची परिक्षा पाहिली. ते कसले आपलें वचन पाळणार ! नाहीं तर आज इतके दिवस त्यांनीं आपल्याला कां चाळवलें असतें ? प्रत्येक मुक्कामची साग्र हकीकत त्याना कळते. दोन तीन दिवसापूर्वीं आपली हकीकत आणि स्थिती महाराजांच्या कानांवर घालून ते काय म्हणतात. हें सत्वर कळविण्यास तेथील एका माझ्या मित्रास मीं लिहिलें होतें. पण त्याविषयीं महाराज कांहीं उत्तर देत नाहींत, असें त्यानें लिहिलें आहे. यावरून माझें खरें कीं खोटें हें आपल्या ध्यानांत येईल.

संयो० काय म्हणतां, महाराजानीं माझी परिक्षा पाहिली ! तुमच्या महाराजांना आपल्या वचनभंगाचें कांहींच कां वाटत नाहीं. खऱ्या प्रेमाची ते अशीच कां किंमत करतात ? मजसारख्या प्रेमानें आंधळ्या झालेल्या अबलेला आपल्या गोड गोड शब्दानें भुरळ पाडून फसविण्यांतच कां त्यांना पुरुषार्थ वाटतो ? एखाद्या गरिब प्राण्याला संशय समुद्रांत लोटून देऊन, तो बुडत असतांना त्याच्या अंतकाळच्या वेदना पहाण्यांतच कां त्यांना आनंद वाटतो ? असो मेलें ! पण या सर्व गोष्टी आपण मला त्यावेळीं कां नाहीं सांगितल्या ? तुम्ही आणि ते रूपसिंग दोघांनीं जें असें कपट केलें, मला हुरूप दाखविलीत, त्यात तुमचा हेतू काय ? माझी अशी दैना व्हावी हें तुम्हाला, त्या रूपसिंगाला आणि तुमच्या महाराजां

नाही चांगलें वाटलें ना ? खरेंच तुम्ही देखील त्यांचेच चाकर ! तुम्हाला दुसऱ्याच्या दुःखाचें वाईट कशाला वाटेल. तरी मला शंका वाटत होतीच. महाराज, शेवटीं माझी अशी स्थिती केलीत ना ? मी तेथें बाबांचा छळ सोसून, आपल्या चरणाचें चिंतन करीत सुखानें आपलें सर्व आयुष्य बंदिवासांत कंठिलें असतें. बाबा, आतां मात्र मी उभय कुलाला कलंक लावणारी झालें खरी ! शिव, शिव, काय हा माझ्या हातून अविचार झाला. महाराज, आम्हा स्त्रियांचें आणि आमच्या प्रेमाचें कांहींच मोल नाहीं असें आपल्याला वाटतें काय ?

**पृथ्वीराज**-अद्याप कांहीं फारसें बिघडलें नाहीं. आतां जरी आपण परत गेलांत तरी जयचंद महाराज आपल्याला क्षमा करतील. (स्तब्धराहून) काय हा त्याचा नीचपणा ! राजकन्ये, तुझ्या सुशीलपणाची, तुझ्या सद्गुणाची, तुझ्या सारख्या बिनमोल रत्नाची जशी त्या जयचंदाला परिक्षा नाहीं, तशीच त्या पृथ्वीराजालाही नाहीं. तूं मात्र त्याच्या करितां हवें तें साहस करायला तयार झालीस आणि कदाचित् त्याच्या करितां आपलें प्राणही देशील, पण त्याचें त्याला काय होय. तो नेहमीं आपल्या विषयांत धुंद, दुसऱ्याच्या मनाची खरी स्थिती समजण्याची आणि दुसऱ्याच्या गुणाची चीज करण्याची त्याच्या ठिकाणीं शक्ती असेल तेव्हांच्या गोष्टी ! कां उगीच त्याच्या नुसत्या वचनावर विश्वास ठेवून आपल्याला फशीं पाडून घेतेस ? सोड त्याचा नाद ! जो तुझ्या गुणाचे चीज करील, जो तुझें वचन आपल्या शिरींधरून नेहमीं तुला आनंद

देण्यांत तत्पर राहील, जो तुला आपल्या हृदयमंदीरांत बसवून सर्वकाल तुझ्या मनोरम मूर्तीची आराधना करील; फार काय सांगू सुंदरी, जो आपलें सर्वस्व तुझ्या चरणीं वाहून आपल्या प्राणाचेंही दान करण्यास मागें पुढें पहाणार नाहीं, अशाला जर तूं आपल्या प्रेमाचें स्थान केलेंस तर, त्यांत उभयतांसही सुख होईल आणि हें सर्व करायला हा सज्जनसिंग या क्षणीं तयार आहे. कदाचित् जयचंद महाराजांची तुला भीति वाटत असेल तर मी खास सांगतों कीं, पृथ्वीराजाला वरल्यानें जितका त्यांना क्रोध येईल, तितका मजविषयीं येणार नाहीं. तूं मला वरलेलें ऐकून त्यांना उलट आनंदच होईल. शिवाय मी आपलें प्रचंड सैन्य घेऊन, ज्यानें तुझी अशी स्थिती केली त्या नीच पृथ्वीराजाचा याबद्दल चांगला सूड घेईन.

संयो०–अहो सज्जनसिंग, तुम्ही त्यांचे सरदार ना, काय हें बोलता! मला वाटतें तुम्ही आज कांहीं शुद्धीवर नाहीं. हें पहा ज्यानें त्यानें आपापल्या पायरीनें राहणें चांगलें!

पृथ्वी०–मी चांगला शुद्धीवर आहे; आणि मी सांगतों तें अगदीं अक्षरशः खरें आहे.

संयो०-अरे देवा, येथें कांहीं तरी कपट आहे.

पृथ्वी–राजकन्ये, यावेळपर्यंत माझ्या कृत्यांत कपट होतं खरें पण तें आतां नाहीं. स्वयंवर समारंभाच्या वेळीं, मी कनोजशरीं होतों. त्या ठिकाणीं झालेला सर्व प्रकार मला माहित आहे. त्यावेळपासून माझें मन तुझ्यावर बसलं आहे. तुझ्याशिवाय मला माझें राज्य, ऐश्वर्य, अथवा हे प्राण

देखील नकोसे झाले आहेत. रात्रंदिवस मला तुझा निजध्यास लागला आहे, कनोजशहरीं घडलेल्या प्रसंगा-वरून; त्यावेळीं माझी मागणी जयंचद किंवा तूं कबूल करशील, ही मला मुळींच आशा नव्हती; परंतु कांहीं तरी युक्ती करून तुझी त्या बंदीवासांतून सुट-का करावी आणि माझें मनोगत कळवून जयचंदा-जवळ मागणी घालण्यापेक्षां तुलाच प्रत्यक्ष मागणी घालावी म्हणून मला ही युक्ती योजावी लागली. तुझ्या प्रेमाचा आणि जयचंदाच्या वैराचा कांहीं तरी भलताच परिणाम होईल हें मला पूर्वींच कळलें होतें. पृथ्वी-राजच काय अधिक आहे, हा सज्जनसिंग कांहीं कमी नाहीं. अगदीं त्याच्या बरोबरीचा आहे. कदाचित् त्याच्यापेक्षांही जास्त आहे. तुझें पृथ्वीराजावर प्रेम फार, म्हणून मी त्याचा सरदार आहे, असें तुला सांगून तुझी सुटका करून तुला येथपर्यंत आणली. बाकी त्या सर्व गोष्टी खोट्या. जसा तो दिल्लीचा राजा आहे त-साच मीही एक बलाढ्य राजा आहे आणि तुझ्या पित्याचा आणि माझा चांगला स्नेह आहे. राजकन्ये, माझा आशावृक्ष खरोखर अगदीं करपून गेला होता, तो पुन्हा टवटवीत होईल असें मला आतां वाटूं लागलें आहे. या देहावर आतां तुझें स्वामित्व. या सज्जनसिं-गाचें तुला वाटेल तें कर. पण मला निराश करूं न-कोस. तुझ्या एका शब्दावर माझें सर्व जीवित्व अवलंबून आहे. ही पहा तुझ्याशीं केलेल्या कपटाबद्दल मी तुझी क्षमा मागतों. ( तिच्या पाया पडण्यास जातो )

संयो०-( त्याला झिडकारून ) मूर्खा, तुझ्या सारखा अधम

मीं जगांत पाहिला नाहीं. “ मी त्यांचा एक सरदार आहे, त्यांनीं आपल्या सुटके करितां मला पाठविलें आहे. स्वारी पुढच्या मुक्कामीं आहे, असें सांगून त्यांची खूण दाखवून ” शेवटीं माझा असा गळा कांपलास काय ? त्या तुझ्या नीच कृत्याबद्दल तुला याच लोकीं प्रायश्चित्त भोगावें लागेल. दुसऱ्याची निंदा करताना तुझी ती अपवित्र जीभ कशी झडली नाहीं; अथवा, देवा मी तरी बहिरी कशी झालें नाहीं. म्हणजे या चांडाळाचे असले दुष्ट शब्द तरी ऐकायला आले नसते. तो रूपसिंग तरी किती दुष्ट, मी त्या तारेचा भाऊ म्हणून काय बोलला, तिची खूण काय दाखविली, मी दिल्लीस गेलों होतों म्हणून काय सांगितलें, बरें रोज त्यांचे गुण काय सांगतों, सर्वच लबाडी. या नीचांनीं काय कपटाचा बाजार मांडला पहा. देवा, हें सर्व जग अशाच नीच लोकांनीं भरलेलें आहे काय ? नाहीं तरी कोणी सांगावें ? कोणतेंही कृत्य पुढची मागची चांगली दूरवर दृष्टी देऊन विचार न करितां केलें कीं, त्याचा पश्चात्ताप झाल्याशिवाय राहत नाहीं. मला तरी काय माहीत कीं, या अधमाचें हे भयंकर कपटपाश इतक्या लांबवर पसरलेले आहेत ह्मणून. दुष्टा, अशा रितीनें मी तुझ्या पाशांत सांपडलें ह्मणून तुझ्या बोलण्यास कबूल होईन असें तुला वाटतें काय ? तूं त्यांच्यापेक्षां ऐश्वर्यानें, बलानें अथवा कोणत्याही गोष्टींनीं जरी मोठा असलास, या सर्व भरत खंडाचा जरी सार्वभौम राजा असलास, अथवा स्वर्गांतील देव, गंधर्व कोणीही असलास तरी मी तुला एखाद्या यःकश्चित् क्षुल्लक प्रा-

ण्यासारखाच मानीन ! तुझी मी या दुष्ट आणि विश्वास घातकी कृतीबद्दल अशीच सदोदित निंदा करीन ! महाराज ऐश्वर्याच्या शिखरावर बसलेले असोत, किंवा दुःखद स्थितींत असोत; ते माझ्यावर प्रेमाची दृष्टी करोत किंवा माझा धिःकार करोत; बाबांचा माझ्यावर जास्त राग होवो, किंवा ते पूर्वीप्रमाणें मजवर प्रीति करोत; माझें जें त्यांच्या ठिकाणीं एकदां प्रेम जडलें आहे, तें किंचितही कमी होणार नाहीं; आणि आतां तर तें तुझ्या नीच कृतीमुळें जास्त दृढ झालें आहे. महाराज मघाशीं मीं या अधमाच्या बोलण्यावर विश्वास ठेवून आपल्याला विनाकारण दोष दिले. या नीचाचें हें कृत्य आहे हें आपल्याला तरी काय माहित. नको नको, या राक्षसाचें पुन्हा तोंड पहाणें नको. अरे घातक्या, सध्यां मी तुझ्या हातीं सांपडलें म्हणून तुझ्या तोंडचीं नाहींतीं भाषणें मला ऐकून घ्यावीं लागत आहेत; नाहीं तर तीं तूं माझ्या समोर कशीं उच्चारलीं असतीस हें मीं पाहिलें असतें. [ जरा शांत होऊन ] पण सज्जनसिंग असें कपट करून तुह्माला काय मिळालें ?

पृथ्वी–माझे मनोगत तुला कळावें, आणि तुला सुख व्हावें यापेक्षां आणखी मला मिळायचें काय ? अगं वेडे, तूं जी एवढी त्याच्यावर प्रीती करतेस, त्याच्या विषयीं आपला एवढा दृढ निश्चय दाखवितेस; त्याचा मोबदला तुला त्याच्यापासून आणि तुझ्या बापापासूनही मिळण्याची आशा नको. त्याच्यामुळें तुला उलट दुःख मात्र मिळत आहे, त्याच्यामुळें, तुझ्या पित्याची तुजवरची अप्रीती झाली, तुला दुर्धर बंदिवास भोगावा

लागला आणि कोण जाणें कदाचित् तुझ्या सौभाग्यावर आणि तुझ्या अमोल प्राणावरही येऊन बेतेल. कारण तुझा पिता त्याचा अपमान झाल्यामुळें हट्टास पेटून त्याचा सूड इव्या त्या रितीनें उगविण्यास तयार होऊन, मोठें सैन्य जमवून त्याच्यावर स्वारी करण्यास तयार झाला आहे. समजलीस ? तेव्हां त्याच्यापासून तुला कितपत सौख्य लागेल हें तूंच आतां आपल्या मनांत समज.

संयो०-हें पहा, अशा रितीनें त्यांच्या विषयींचा माझ्या अंतःकरणांतील प्रेमाचा झरा आटेल असें तूं बिलकूल समजूं नकोस ! नुसता बंदिवासच काय, पण मनुष्यावर या जगांतील जितकीं ह्मणून संकटें असतील तितकीं जरी माझ्यावर एकदम येऊन कोसळलीं, तरी मी तीं त्यांच्या करितां मोव्या धैर्यानें सोशीन. कदाचित् दोघांच्या लढाईत माझ्या दुर्दैवानें जर भलताच प्रसंग आला तर मी मोव्या आनंदानें त्यांच्या बरोबर सहगमन करून स्वर्गीं अखंड सौख्य भोगण्यास मोव्या आनंदानें जाईन. त्या ठिकाणीं तर माझ्या बाबाच्या रागाचें आणि तुझ्या सारख्या अधमाधमाच्या कपट कृतीचा कांहीं उपयोग होणार नाहीं !

पृथ्वी-वा, यांत मोठा शहाणपणा कां आहे ?

संयो०-तुमच्या सारख्यानें असलें विश्वासघाताचें कृत्य करावे यांत मात्र खरा शहाणपणा ! [ रागानें ] या वेळपर्यंत मी तुमच्याशीं बोललें हाच माझा आधीं वेडेपणा झाला. चला—चला --येथून चालते व्हा कसे ?

पृथ्वी—पण—

संयो०-आतां एक अक्षर देखील बोलूं नका ! देवा, या चांडाळानें कसा दावा साधला पहा. खरोखर अविचाराची, साहसाची आणि कपटाची मूर्तिमंत पुतळी असें मला आतां सर्व जग म्हणेल बाबा, आई या कपाळ करंटीनें तुमच्या पोटीं येऊन तुमच्या उज्वल कीर्तीला अखंडचा डाग लावला. आतां मला हें काळें तोंड जनाला दाखविण्याला एक क्षणभरही जगून उपयोग नाहीं. आतां मी धड इकडे नाहीं आणि तिकडेही नाहीं. माझ्या सर्व आप्तवर्गांना माझ्या कृतीनें खरोखर जगांत तोंड वर काढण्यास जागा राहिली नाहीं. काय करूं ? हें माझें कठिण हृदय अद्याप कसें फुटून जात नाहीं. महाराज, आपल्या प्रेमाचा असाच शेवट व्हावा असेंच त्या ईश्वराच्या मनांत होतें अं:, हाय हाय-संयोगिते तूं खरोखर अभागीग अभागी-

( असें ह्मणून मुर्छित पडते. इतक्यांत रूपसिंग येऊन तिला सावध करतो. पृथ्वीराज जरा आड होतो. )

रूप०-बाईसाहेब, बाईसाहेब, सावध व्हा. हा मी रूपसिंग आपल्या जवळ आहे.

संयो०-[ त्वेशानें उठून ] कोण रूपसिंग, चला तुह्मीही माझ्या डोळ्यापुढून चालते व्हा. त्या मेल्या सज्जनसिंगाचें तुह्मी मिलाफी आहांत. सर्व मेळा दुष्टांचा बाजार भरला आहे.

रूप०-मज गरिबावर इतकी अवकृपा कां ? माझ्या हातून असा काय अपराध झाला.

संयो०-तुम्ही आधीं मनुष्य आहां काय ? छे, नाहीं, मनुष्य

रूपी राक्षस आहांत ! कारण राक्षसाच्या देखील कृतीला लाजवितील अशीं तुमचीं अघोर कर्मे आहेत. एक सिद्ध आणि दुसरा साधक. आणखी " माझ्या हातून असा काय अपराध झाला म्हणून विचारता " काय तुम्हाला म्हणावें तरी काय ? देवा मी या राक्षसाच्या वचनावर विश्वास ठेवून या वाघाच्या गुहेंत कशी येऊन पडलें ! आतां मात्र माझ्या प्रारब्धाच्या खेळाचा कळस झाला.

रूप —काय आपला विश्वासघात झाला. आपल्याला मीं फसविलें ! अशी गोष्ट माझ्या मनांत सुद्धां येणार नाहीं.

संयो—मनांत आल्याशिवाय कां हातांनें तशी कृती झाली ! त्या सज्जनसिंगानें माझी जी छळणूक केली ती तुम्हाला माहित नाहीं ना ! अहो— मी—

( इतक्यांत पृथ्वीराज आपला पूर्वीचा वेष टाकून राजवेष घेऊन पुढें येतो. संयोगिता त्याला पाहून रागानें लाल होते. दोघे उठून उभे राहतात )

पृथ्वी- ( आनंदानें ) रूपसिंगजी, त्या कामांत माझ्याकडून फार मोठी चूक झाली. तुझ्या धनिनाला मी विनाकारण संताप आणला. याबद्दल मला आतां फार वाईट वाटतें !

संयो-( आश्चर्यकित होऊन ) रूपसिंगजी, हेच सनजसिंग. यानींच माझा छळ केला.

रूप-छे, बाईसाहेब हे आमचे दिल्लीपती महाराज पृथ्वीराज. आपण चूकला असाल.

संयो-चूकेल कशी ! याना मी रोज पहाते; आणि हे सज्जनसिंग महाराजांचे एक सरदार असें मला प्रथम तुम्हीच सांगितलें आणि आतां तुम्ही हेच महाराज आहेत म्हणून म्हणतां ! तेव्हां खरें काय ? रूपसिंगजी, असें मला फसविण्यांत, नाना तऱ्हेनें माझी छळणा करण्यांत आणि जगांत माझी फजिती करण्यांत तुम्हाला आनंदच वाटतो ? त्यापेक्षां एकदम तुमच्या तरवारीनें माझा गळा कांपा आणि व्हा मोकळे ! तुमच्या या दुरुपी भाषणानें आणि कपट कृतीनें माझ्या ऱ्हदयांत काय कल्लोळ उडवून दिला आहे, तेथें दुःखाग्निनें कसा पेट घेतला आहे आणि प्रत्येकक्षणीं माझ्या मनाची काय स्थिति होत आहे, हें जर माझें ऱ्हदय मला उघडून दाखवितां आलें असतें तर तूह्माला कळलें असतें; दुसऱ्यास दुःख होत असतां पाहून आपण आनंद मानणें हें कांहीं मोठेपणाचें लक्षण नव्हें.

पृथ्वी-रूपसिंगजी, आपल्याला कांहीं बुवा आंत एक आणि बाहेर एक असें मुळींच करतां येत नाहीं. जें मनांत तेंच जनांत ! जें स्वप्नांत तेंच जागेपणीं; आणि हें खरें कीं खोटें याबद्दल प्रत्यक्ष तुझ्या धनिनीलाच विचार !

संयो०-[ मनांत ] यामुळें माझ्या मनाचा अगदीं गोंधळ उडून गेला आहे. मला कांहीं एक सुचत नाहीं. हे महाराज म्हणावें तर अशा रितीनें मला छळण्यांत त्यांचा हेतू काय ?

पृथ्वी०—प्रिये, हा सज्जनसिंग दुसरा कोणी नसून, तुझ्या प्रेमपाशानें बद्ध झालेला हा तुझा दास पृथ्वी-

राजच होय. तुझें माझ्यावर जडलेलें निर्मळ प्रेम, त्यामुळें झालेला तुला कारागृह वास, तुझा दृढ निश्चय, तुझ्या बापाच्या मनांत मजविषयींचें माजलेलें वैर, वगैरे सर्व गोष्टी या रूपसिंगजीकडून जेव्हां मला कळाल्या, तेव्हां मी लागलीच तुझी सुटका करण्याचा निश्चय केला आणि तो यांच्या साह्यानें शेवटास जाऊन परमेश्वराच्या कृपेनें हा मला अलभ्य लाभ मिळाला. आजपर्यंत मी तुला संशयांत ठेऊन जें दुःख दिलें, तुला जें बोललों त्या माझ्या मागिल सर्व अपराधाबद्दल तूं मला क्षमा कर. उत्तम बावनकशी सोनें आहे अशी आपली खात्री असून पुन्हा त्याला तावाला लावून पहाणें खरोखर वेडेपणा होय ? माझ्या पूर्वीच्या भाषणावरून हेंही माझें भाषण कपटाचें असेल आणि अद्यापी जर तुझी खात्री होत नसेल तर ही माझी खुणेची आंगठी पहा. कदाचित् सज्जनसिंगापाशीं ती जाईल, पण हें शिवचिन्ह सज्जनसिंग पृथ्वीराजच असल्याशिवाय त्याच्या हातावर असणार नाहीं.

संयो०–[ मनाशीं ] या चिन्हा विषयीं तारा एक दोन वेळ बोलली होती. देवा मी स्वप्नांत तर नाहीं ना ? आणि मी पहातें हें स्वप्नच असेल तर हें असेंच राहो— महाराज—

( पृथ्वीराज तिला आलिंगन देतो. )

पृथ्वी–प्रिये, केलीस ना माझ्या अपराधाची क्षमा ?

संयो०–महाराज, मी कां आपल्याला क्षमा करायची ! दोहींकडे फसल्या सारखी झाल्यामुळें, त्यावेळची माझी

स्थिती, जनापवादाच्या भीतीमुळें होणारें दुःख वगैरे सर्व गोष्टी आपण मनांत आणल्या म्हणजे, आपल्याशीं जी माझी निंद्य वर्तणूक झाली त्याबद्दल मी दोषी कीं निर्दोषी याबद्दलही आपली खात्री होईल.

पृथ्वी–छे, छे, लाडके, त्या तुझ्या वर्तणुकेबद्दल जो तुला दोष देईल तो महामूर्खच समजला पाहिजे. त्या तुझ्या वर्तणुकेनें तुझ्या खऱ्या प्रीतीची, पातिव्रत्याची, तुझ्या सौजन्याची, आणि तुझ्या दृढनिश्चयाची चांगली साक्ष पटविली. त्या तुझ्या पित्याला तुझ्याबद्दल काय वाटत असेल तें वाटो, पण मी परमेश्वर साक्ष ठेवून सांगतों कीं, तूं आपलें जीवित अर्पण करून मला धन्य केलेंस, माझ्या चव्हाण वंशाला शोभा आणलीस, माझा कीर्तिध्वज तूं उभारलास, माझ्या सौख्य सागराला भरती आणून तूंच उचंबळण्यास लावलास, फार काय सागूं, तूं आपल्या गुणानें मला तुझ्या प्रेमाला योग्य करून घेतलेस. देवा, ही आमची प्रेम गांठ अखंडित राहूं दे.

संयो०–आपण माझा अभिमान धरलांत म्हणून सर्व ठीक झालें, नाहीं तर या दासीची काय बरें स्थिति झाली असती.

पृथ्वी०–प्रिये, मीच काय, पण या भरतखंडांतील प्रत्येक मनुष्याला तुझ्या गुणाबद्दल अभिमान वाटेल.

संयो०-या आनंदाच्या वेळीं जर माझी प्रियसखी तारा असती तर तिला किती बरें आनंद झाला असता–

पृथ्वी०-तारा कोण ?

संयो०–ती आपल्याच दिल्ली शहरांतील एक दासी होती.

कनोज शहरीं माझ्याजवळ होती, तेव्हां आपल्याविषयीं तीच मला नेहमीं गोष्टी सांगत असे. ती एकदम नाहींशी झाली म्हणून बाबाच्या तडाक्यांतून सुटली, नाहीं तर बिचारी जिवासच मुकती. आतां ती आपल्या दिल्ली शहरांतच आहे असें हे रूपसिंगजी सांगतात. रूपसिंगजी, तिला केव्हां भेटवाल. तिला मी केव्हां पाहीन असें मला झालें आहे.

**रूप**–बाईसाहेब, आपण शहरांत गेला म्हणजे ती आपणास खास भेटेल.

**पृथ्वी०**–रूपसिंगजी, कन्हराय सेनापतीस उद्यां प्रांतःकाळीं शहरांत जाण्याची तयारी करण्यास आणि चहूंकडे आनंदोत्सव करण्यास सांगा.

**रूप**–महाराजांच्या आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था करवितों.

**पृथ्वी०**–प्रिये, मी आतां तुला आजपर्यंत दिलेल्या विरह दुःखाचें जेव्हां शांतवन करीन तेव्हां मला आनंद होईल.

( सर्व जातात )

---

## प्रवेश ३ रा.

---

**स्थळ.**–बागेंतील रूपसिंगाचा तंबू.

**पात्रें**–( रूपसिंग एकटाच बिछान्यावर पडला आहे; जवळ दिवा मिणमिण करीत आहे.

**रूप०**–( आपल्याशीं ) आकाशांत मध्यानरात्रीं काळीभोर ढगें येऊन मग तीं हलके हलके नाहींशीं झाल्यावर जी

ती मध्यान रात्र, मग चंद्रप्रकाशानें आनंदकारक आणि शांत भासते, त्याप्रमाणें राजकन्येचे आणि महाराजांचें मनोरथ सफल होऊन माझ्यावरचें एक मोठें ओझें उतरल्यानें कितीतरी माझ्या मनाला हलकें वाटून आनंद होत आहे. आज मात्र मला रात्रीं चांगली शांतपणें आणि सुखाची झोंप येईल. कोणीकडे तो मूर्ख शिरोमणी कहरकंठीर, आणि कोणीकडे हे आमचे सर्वगुणसंपन्न वीरश्रेष्ठ महाराज! ब्रम्हदेवानें जें कपाळीं लिहिलें असेल तें कधींही टळत नाहीं आणि दृढनिश्चयाचें फळ परमेश्वर दिल्याशिवाय राहत नाहीं, हें खोटें कसें होईल? जयचंद महाराजांचा क्रोधाग्नि आतां जास्त भडकून फार प्रळय करील हें खरें, पण बिचाऱ्या संयोगितेचा मनःताप शांत झाला, त्यामुळें मला त्याचें कांहींच वाटत नाहीं. जयचंद महाराज, आप या मात्र गुणाची जनांनीं चांगली परीक्षा केली. असो, पुढें कां होईना, सध्यां तर आपण आपल्या कामगिरींतून मोकळे झालों. पुढच्या पुढें. अरे पण हो, शेवटीं तें लचांड राहिलेंच! त्याचें काय करावें? (विचार करीत स्तब्ध राहतो) असें करावें कां? नको! जसें चाललें आहे तसेंच चालूं द्यावें! प्रालब्ध योगानें जसें व्हायचें असेल तसें होईल. उगीच विनाकारण काळजी करून उपयोग काय? (इतक्यांत मध्यान रात्रीचा गजर होतो) अबब, बरीच रात्र झाली! उद्यां सकाळीं स्वारी शहरांत जाण्याची गडबड आहे तेव्हां आतां जरा स्वस्त झोंप घ्यावी! (बिछान्यावर पडतो) निद्रे, तुझ्यापाशीं लहान मोठा, राजा रंक सुखी आणि दुःखी

वगैरेचा कांहीं भेदाभेद नसतो. तुझ्या आश्रयस्थानांत सर्व सारखेच ! त्यांत पक्षपात मुळींच नाहीं. जें सुख राजाला चंदनाच्या उंच छपरपलंगावर मऊ गादीवर मिळतें, तेंच एखाद्या काबाड कष्ट करून पोट भरणाऱ्याला आणि वेळीं जमिनीचें अंथरूण आणि आकाशाचें पांघरूण करणाऱ्या गरिबाला मिळतें. तर हे मनः संतापहारिणी सुखदायिनी निद्रे, माझ्यावर कृपाकर आणि मला आतां तुझें अनुपम सुख मिळूं दे !

(तो निजतो, त्याला गाढ झोंप लागते; इतक्यांत हाहुरीराय हलके हलके येतो)

हाहुरीराय–( आपल्याशीं ) हा कांहीं खरोखर रूपसिंग नव्हे. रूपसिंगाचें सोंग घेतलेली कोणी तरी स्त्री आहे खचित् ! त्याशिवाय त्या दिवशीं त्याच्या तोंडून "बाई" असे शब्द निघाले नसते. कांहीं होवो यांतलें खरें इंगित काय आहे याची आज शहानिशा केल्याशिवाय राहयचें नाहीं. बरें कदाचित् स्त्री असली तर पुरुषाचें सोंग घेऊन महाराजाजवळ राहून त्यांची मर्जी संपादन करून घेण्यांत हिचा मतलब काय ? या कपट नाटकाचा जर मला पत्ता लागला तर किती तरी कारस्थानें बाहेर पडतील. कदाचित् दुसरें तिसरें कांहीं साधलें नाहीं तर या गुप्त स्त्रीरत्नाचा तर गुप्तरीतीनें उपभोग घ्यायला सांपडेल. यापेक्षां आपल्याला जास्त काय पाहिजे. ( जवळ जातो ) या वेळेला याला अगदीं गाढ झोंप लागली आहे हें फार चांगलें झालें. दैव अनुकूल असलें म्हणजे सर्व

गोष्टी आपोआप जुळून येतात. ( निरखून पाहतो ) वा, याचें सौंदर्य खरोखर अलौकिक आहे. हें याचें कपाळ उंच असून भव्य आहे. नाक चांगलें तरतरीत आहे. डोळे चांगले मोठे दिसतात, आणि त्या वरच्या भिंवया बारिक असून वांकविलेल्या धनुष्याच्या कमानी-प्रमाणें आहेत. ओंठ बारिक असून लाल आहेत. दिव्याचा जरी मंद प्रकाश पडला आहे तरी याचें गोरेपण झांकलें जात नाहीं. याचे हात पाय कसे गोंडस असून नाजूक आहेत. याच्याकडे एकसारखें पहातच रहावें. इतक्या याच्या चेहेऱ्यांत मोहकपणा आहे. असला नाजुकपणा, इतका मनाला आकर्षण करणारा मोहकपणा आणि असें सुंदर रूप, पुरुषाच्या ठिकाणीं असलेलें आपल्या मुळींच पहाण्यांत आलें नाहीं. आतां एक शंका आहे, तेवढी फेडून घ्यावी म्हणजे झालें. ( खालीं बसून हलकेच उरावरचा शेल्याचा पदर दूर करून त्याच्या अंगरख्याचे बंद सोडून पाहून आनंदानें टाळी वाजवून म्हणतो ) अहाहा, झालें माझें काम ! आंता शंका कसली ! तरी म्हटलें कीं, पुरुषाच्या ठिकाणीं इतकें सौंदर्य ठेवून ब्रम्हदेव चुकला कसा ! रूपसिंगजी, शेवटीं यांनीं आपल्याला फसविलें. शाबास, ठाकुरीराय शाबास ! शेवटीं गड घेतलास ! धन्य तुझें नशिब, ही आतां माझ्या तडाक्यांत चांगली सांपडली ! या वेळेला मी जसें म्हणेन तसें हिनें ऐकलें पाहिजे, अथवा आपल्या प्राणाची तरी आशा सोडली पाहिजे. हिच्या अधरामृताचा घुटका घेण्यास मी अगदीं उत्सुक झालों

आहे. माझे हेतू सफल करून घेण्याची अशी उत्तम संधी पुन्हा कधीं मिळणार नाहीं. करूं कां तसें ? काय हरकत आहे. कोण आहे येथें पहायला ! ( असें म्हणून रूपसिंगाचे चुंबन घेण्याकरितां खालीं वाकतो, तों त्याचा पाय हातावर पडून रूपसिंग घाबरून उठतो आणि लगबगीनें आपला पोषाख सांवरतो. )

रूप०—[ हाहुरीरायाकडे पाहून ] चोर—चो—

हाहुरी-हंः चिप. खबरदार ओरडलास तर ! मी चोर नव्हे.

रूप०-[ त्याच्याकडे पाहून. ] हे हाहुरी आहेत. हाहुरीराय तुम्ही इतक्या रात्रीं इकडे कोणीकडे आलांत ? मला वाटतें तुम्ही आपला तंबू चुकलांत. हा रूपसिंगाचा तंबू आहे. तुमचा तंबू त्या तिकडच्या बाजूला आहे. चला पाहिजे असेल तर मी तुह्माला तुमच्या तंबूत नेऊन पोंचवितो.

हाहुरी मी जागा चुकलों नाहीं, मी मुद्दामच येथें आलों.

रूप०—काय मुद्दाम येथें आलांत ! ते कायह्मणून ? यावेळीं तुमचें काय काम आहे. माझ्या तंबूंत रात्रीं कोणीही येऊं नये अशी माझी सक्त ताकीत आहे ती तुम्ही विसरलांत कां ?

हाहुरी--अंः. त्या ताकिदीचेंच कारण काय तेंच पहाण्यास आणि तुमच्याशीं माझें जें काम आहे तें करून घ्यावें ह्मणूना मी या वेळीं आलों.

रूप०—उद्यां मला पुष्कळ वेळ आहे, खुशाल आपण गप्पा मारीत बसूं. सध्यां माझें डोकें फार दुखतें आहे; मला जरा स्वस्थ झोंप घेऊंद्या.

हाहुरी—मुद्यापत्यानिशीं चोर चोरींत पकडला म्हणजे त्याची

अशीच धांदल उडते. ( रागानें ) उद्यां नाहीं, माझें काम आतांच तुमच्याशीं आहे; आणि मी जें सांगेन तें तुम्ही आतांच ऐकिलें पाहिजे. कारण अशी अमोल संधी पुन्हा कसची सांपडते ! तुझें खरें स्वरूप कोणचें आहे, हें मीं केंव्हांच ओळखलें आहे. सुंदरी, कां उगीच आतां या हाहुरीरायापुढें लपवालपवी करतेस.

रूप०–[ घाबरून मनाशीं ] झाला, आतां सर्वस्वी घात झाला ! आतां काय करूं ! या ठिकाणीं देखील हें माझ्या दुर्दैवा माझा पाठ तूं सोडली नाहींस ना ! अशा वेळेला धैर्य सोडून उपयोग नाहीं ! [ उघड आणि हांसून ] वा हाहुरीरायजी, खूप केलीत. मला खास वाटतें कीं तुम्ही स्वप्नांत आहांत !

हाहुरी–पुरुषाचें सोंग घेतलेली जर स्त्री नसेल तर मात्र मी स्वप्नांत आहे खास !

रूप०–तुम्ही हें कांहीं तरी बडबडतां ! मी जसा तुम्हाला दिसतो तसाच आहे. गरिबाला उगीच नाहीं तें भलतेंच बोलून त्रास देणें तुमच्या सारख्याला योग्य नाहीं. तुह्मी मोठे कुलीन सरदार आहांत; तेंव्हां मोठ्या लोकांनीं मोठेपणानेंच वागलें पाहिजे. चला चालते व्हा येथून. नाहीं तर ती तुमची असभ्य वर्तणुक मला महाराजांच्या कानावर घालावी लागेल.

हाहुरी–( मनाशीं ) अशा पुळपुळीत बोलण्यानें कांहीं ही ऐकायची नाहीं. आजपर्यंत वेषांतरानें राहून जिनें सर्वांना चकवून एवढीं कारस्थानें केलीं, ती काय सामान्य स्त्री आहे. या स्त्रिया कोणत्या वेळेला काय साहस करतील आणि लोकांच्या डोळ्यांत कशी धुळ टाकतील हें दि-

व्यद्दष्टीनें पहाणाऱ्या देवांना देखील कळत नाहीं, असें ह्मणतात तें कां खोटें! हिची चांगली खोड मोडली पाहिजे. [ उघड ] तूं ही गोष्ट महाराजांच्या कानावर घातलीस कीं लागलेच तूं जें हें सोंगाचें पांघरूण घेतलें आहेस तें ओढून काढून सर्व जगाला तुझें खरें स्वरूप दाखवून तुझी चहूंकडे फजिती करून सूर्योदयाबरोबर तुला तोफेचे तोंडीं देऊन उडवून टाकीन तरच मी नांवाचा हाहुरीराय, आणि तें देखील पुराव्यानिशीं! उगीच नुसत्या कल्पनेवर नव्हे.

रूप०–काय आहे हो तुमच्यापाशीं पुरावा! थांबा, मी आतांच तुमचा बंदोबस्त करतों! ( बाहेर जाऊं लागतो )

हाहुरी–[ त्याला थांबवून ] थांब, चाललीस कोणीकडे? मी-सांगतों तें प्रथम सर्व स्वस्थपणानें ऐकून घे आणि मग तुला वाटेल तें कर. हें पहा, बोलणें, चालणें, बसणें, उठणें वगैरे गोष्टी आणि दुसरीं बाहेरचीं सर्व चिन्हें तूं आपल्या कृतीनें लपवून, मोठ्या शहाणपणानें, आणि सावधगिरीनें आपल्या सोंगाची आजपर्यंत चांगली व तावणी केलीस. पण ईश्वरदत्त जें स्त्रियाचें चिन्ह तें तूं कसें लपविणार. या तुझ्या उरोज भूषणांनीं तुझें सर्व सोंग बाहेर पाडलें. यापेक्षां आणखी भक्कम पुरावा काय पाहिजे सांग?

रूप०–[ लज्जेनें खालीं मान घालून स्तब्ध राहतें. ] कपाळवर हात मारून दुःखानें ] देवा, ज्या कर्माला मी आजपर्यंत भीत होते, तेंच पुढें येऊन उभें राहिलें. झालें आटोपला सर्व अवतार! या चांडाळानें खरा दावा साधला! आतां माझ्या फजितीला पारावार नाहीं.

हाहुरी–[ मनाशीं ] मात्रा चांगली लागूं पडली ! [ उघड ] हे सुंदरी, तुझी मुद्दाम फजिती करावी, तुझे हालहाल करावें आणि तुझें सर्व प्रकारें नुकसान करून तुझ्या अमोल प्राणावरही वेळ येऊन बेतावी, अशी माझी मुळीं सुद्धां इच्छा नाहीं; परंतु तसें करणें मला भाग पाडणें, अथवा करूं न देणें हें सर्व तुझ्यावर अवलंबून आहे. प्रथम तुझ्या रूपावरून माझ्या मनांत शंका आली. मग मी तुझ्याशीं नेहमीं बोलण्या चालण्याचा प्रसंग ठेवून जास्त सलगी करूं लागलों, पण तुझ्या तुटक स्वभावानें आणि तूं महाराजांच्या जवळ नेहमीं असल्यानें मला पाहिजे तशी संधी मिळत नसे; तरी मीं आपला नाद सोडला नाहीं. आज संध्याकाळच्या आधीं लतामंडपांत तूं आपल्याशीं बोलत असतां, तुझ्या तोंडचे " बाई " हे शेवटचें शब्द माझ्या कांनीं पडले, त्यामुळें माझ्या पूर्वींच्या शंकेला जास्त बळकटी आली; आणि आज त्या शंकेचें मी पूर्ण निरसन करून घेतलें. तुझ्या तंबूत इतक्या रात्रीं जों मीं आलों आणि हें धाडस केलें तें काय तुझ्या अंगावरच्या सोनाच्या तुकड्यासाठीं आणि हिरे माणिकासारख्या दगडासाठीं; ते काय माझ्या पाशीं कमी आहेत म्हणून, त्याची चोरी करायला आलों. तुझ्या सौंदर्यापुढें त्यांची काय किंमत ? अग वेडे, ते तुझ्या सारख्या रूपसुंदरीच्या अंगावर असतात म्हणून तर त्यांना शोभा येते; नाहीं तर ते दगडच. मी फक्त तुझें सौंदर्यभांडार लुटण्यास आलों. खरोखर, परमेश्वरानें तें तुझ्या ठिकाणीं किती भरून

ठेविलें आहे याचा अंतच नाहीं, आणि तें सोडून जा वेसेंही वाटत नाहीं.

रूप०–[गहिंवरुन माझा असा घात करून तुम्हाला काय फळ मिळणार ! मी आपल्या पाया पडते, आपण मला क्षमा करा, कदाचित् दैवयोगानें माझें चांगलें दिवस आले तर मी आपले उपकार कधींही विसरणार नांहीं, आपण कृपाकरून-ही–गोट-[ तिचा कंठ दाटून येतो–ती खालीं बसते. ]

हाहुरी–छे, छे, तसें करण्याचा माझा मुळींच हेतू नाहीं, हें मी तुला प्रथमच सांगितलें आहे. सवलतीनें जी गोष्ट सुखकर होते ती मुद्दामपणानें आणि हेकेखोरपणानें होत नाहीं. तूंही पण माझी एक गोष्ट ऐकिली पाहिजे.

रूप०–ऐकण्यासारखी असेल ती मान्य करण्याला मी अनमान करणार नाहीं. सांगा आपण.

हाहुरी–हें पहा ती मी तुला आतां स्पष्टच सांगतो. तुझ्या सौंदर्यानें मी अगदीं वेडा झालों आहे; आणि तुझ्या ठिकाणीं माझें अत्यंत प्रेम जडलें आहे. त्या प्रेमाचा योग्य मोबदला या दासाचा स्वीकार करून याला दे ह्मणजे झाले ! मी कांहीं सामान्य मनुष्य नाहीं. महाराजांच्या मोठ्या सामंत सरदारांपैकीं एक मोठा सरदार आहे. माझी संपत्तिही कांहीं कमीं नाहीं. तुला मी माझी आराध्यदेवता समजून तुझ्या वचना बाहेर एक पाऊलही टाकणार नाहीं. माझ्या सर्व संपत्तीची मालकीण तूं ! तूं माझ्यापाशीं राहिल्यानें तुला कोणत्याही प्रकारानें कमीपणा येणार नाहीं. महाराजांची तुझ्यावर अत्यंत मर्जी आहे म्हणून कदाचित् तुला तसें राहण्यास

अडचण वाटत असेल तर त्यालाही मी एक युक्ति सांगतों; त्यामुळें, कोणतीही अडचण न राहतां आपलें उभयतांचें प्रेम अगदीं गुप्त राहून अबाधित चालेल. दिवसा तूं महाराजापाशीं सध्यां आहे त्याच वेषानें रहा म्हणजे मग कोणालाही संशय येणार नाहीं. कदाचित् महाराजानां ही गोष्ट कळली तरी मी त्याची फारशी पर्वा करीत नाहीं. तुझ्या एका केंसाला धक्का तो माझ्या प्राणाला असें समज ! तुझ्या करितां मी माझ्या सर्व संपत्तीवर सुद्धां लाथ मारीन; या देशाच ही त्याग करीन, तुझ्या करितां हवे तें करीन; पण हें सर्व तुझ्या तोंडांतील दोनच शद्बावर अवलंबून आहे. सुंदरी, मानवलीना तुला ही माझी गोष्ट. करशीलना या तुझ्या दासाला आलिंगन सौख्यानें धन्य ! तूं या पुरुषवेषांत तरी किती मारू दिसतेस ! पुरुषवेष घेऊन असले कष्ट सोसून आपल्या तारुण्याचा उपभोग न घेतां तो फुकट कां बरें घालवितेस ! नवरसानें परिपूर्ण भरलेलें तुझें हें तारुण्यकुसुम तसेंच कोमेजून टाकण्यांत तूं परमेश्वराच केवढा बरें अपराध करीत आहेस.

रूप०–( मनाशीं ) जे हे मले हाहुरीरायासारखे शेंकडो सरदार माझ्यापुढें हात जोडून उभे असत, जे माझें बोलणें झेलण्यास नेहमीं तयार असत, जे महाराजांही कृपा व्हावी म्हणून माझी नेहमीं मनधरणी करीत असत; त्याचपैकीं एकापुढें आतां मला हात जोडण्याची दुर्दैवानें पाळी येऊन याचे असले वाणेरडे शद्ब ऐकावे लागत आहेत. एकदां कुठें चुकून माझ्याकडून अपराध घडला, त्यामुळें मी महाराजांच्या प्रेमाला

सर्वस्वी मुकलें आणि दाही दिशेला लागले. ही शिक्षा काय मला थोडी झाली. महाराजांचा पूर्वीचा मजवर राग आहे, आणि तो मी खरोखर कोण आहे हें त्यांना कळल्यावर आतां जास्त वाढून कदाचित् माझा ते शिरच्छेदही करतील, असें जरी आहे तरी मला तें सर्व पतकरेल! पण पूर्वींचा केलेला एक अपराध लपविण्या करितां दुसरा तितकाच भयंकर अपराध, त्यांच्या रागाला आणि परिणामाला भिऊन, करून, या मेल्याची सदोदित अंकित होऊन मी कधींही राहणार नाहीं एक दुष्टकृत्य लपविण्या करितां दुसरें, दुसरें लपविण्या करितां तिसरें, असें कृत्याचें भयंकर जाळें मनुष्य त्यांतून सुटण्या करितां ह्मणून करतें पण त्यांतच शेवटीं फसून आपला सर्वस्वी नाश करून घेतें! करितां या भयंकर जाळ्याचा पहिलाच दोरा मोठ्या धैर्यानें तोडून टाकला म्हणजे त्यांत गुरफडून फशीं पडण्याची भीति बाळगण्याला नको. बस्स, झाला माझा निश्चय काय होईल तें होवो !

हाहुरी–अग वेडे, एवढ्याशा सोप्या गोष्टीला एवढा कसला विचार करतेस !

रूप०-( रागानें ) हाहुरीराय, यावेळपर्यंत मी आपलें सर्व बोलणें ऐकलें. मी गरीब अबला तुमच्या सारख्या वाघाच्या तावडींत सांपडलें म्हणून तुमच्या दुष्ट वासनेला कबूल होईन, असें तुम्ही समजूं नका; आणि एखादीला पेंचांत पकडून तिच्या कडून आपलें म्हणणें कबूल करून घेण्यांतही कांहीं मोठा पुरुषार्थ नाहीं. हा निव्वळ भागूबाईपणा होय. तुमच्या पदवीची, आणि

तुमच्या मोठेपणाची, आणि तुमची मला बिलकुल जरूर नाहीं. तीं सर्व मी कस्पटाप्रमाणें मानतें समजलात ! तुम्ही आलेत तसें चालते व्हा, आणि असले दुष्ट शब्द उच्चारण्याला पुन्हः आपले तोंडही मला दाखवूं नका !

हाहुरी–तुझ्या दुःखाचें मी निरसन करून, तुझ्यावर उपकार करीत असतां, या हाहुरीरायाचा असा धिःकार कां बरें करतेस ? सुख कांहीं वारंवार येत नाहीं. तेव्हां त्याच्यावर लात मारताना तुझ्या सारख्या शहाण्या स्त्रीनें विचार करावा.

रूप०–( तिरस्कारानें ) काय हो तुम्हीं हा चवळपणा चालविला आहे.

हाहुरी–( मनाशीं ) ही अशानें वठणीला येणार नाहीं. महाराजांची कामगिरी बजावल्यामुळें जडलेल्या त्यांच्या मर्जीच्या घमेंडीत ही आहे. पण या बहादरापुढें ती घमेंड कशी चालणार ! हिला आतां निराळेंच रूप दाखविलें पाहिजे. ( उघड ) मूर्खे, या वेळपर्यंत मी तुझी इतक्या, तऱ्हेनें विनवणी केली त्याचीफेड तूं अशा रीतिनें करतेस काय ! या हाहुरीरायाशीं गांठ आहे हें तूं पक्कें लक्षांत ठेव. तुला आतां शेवटचें, सांगतों कीं, मी माझे हेतू पूर्ण करून घेतल्या शिवाय, तुझ्या अधरामृताचें पान केल्याशिवाय, आणि तुला आपलीशी केल्याशिवाय येथून कधींही जाणार नाहीं; तुला पहायचें असेल तर आतांच काय तमाशा होतो तो पहा. पण वेडे या थराला गोष्ठ कां आणतेस ? या तुझ्या मनोहर रूपाची आपल्या हातानें माती का

करून घेतेस. मनोहारिणी–( तिच्याजवळ जाऊन तिची हनुवटी धरूं लागतो, ती त्याच्या तोंडांत मारते.)

रूप -निलाजऱ्या हो मागें ! आतां पुन्हा पुढें आलास तर प्राणासच मुकशील.

हाहुरी–दुष्टे, तूं कोणाचा असा अपमान करतेस याचा विचार केला नाहींस. पहातों आतां तुझें यावेळीं कोण रक्षण करतो तें ! ही पहा तुझ्या पुरुषवेषाची आणि तुझी कशी दशा करतो ती ! तिच्या अंगावर धांवून जाऊन तिच्या डोक्याचा शेला ओढतो आणि तिच्या अंगावरचें वस्त्र हिसकावून घेतो.

रूप–[ मोठ्यानें ओरडतो ] महाराज—बाईसाहेब, धांवा हो–धांवा, हा—मेला—

हाहुरी–ओरडतेस काय ! [ तो तिचें तोंड दाबतो, दोघांची झटापट होते, इतक्यांत पृथ्वीराज आणि जयदेवसिंग येतात, त्यांना पाहून हाहुरीराय ओरडतो.]

हाहुरी -दगा, दगा, दगा !

पृथ्वी०–जयदेवसिंग, येथूनच आवाज आला, आणि तो रूपसिंगाचा आहेसा वाटतो, पहा बरें काय गडबड आहे ती ! ( दोघे जरा पुढें होऊन ) पकड त्या चोराला, बांध त्याच्या मुसक्या !

[ जयदेवसिंग हाहुरीरायास पकडतो. ]

रूप–[ सुटून पृथ्वीराजाच्या पायावर येऊन पडतो ] महाराज, या दुष्टापासून माझ्या अब्रूचें रक्षण करा.

पृथ्वीराज -( आश्चर्यानें चकित होऊन ) हें काय ? शद्बावरून आणि चेहेऱ्यावरून तर हे आमचे रूपसिंग

दिसतात; असें असून हे माझ्या अन्नुचें रक्षण करा असें काय म्हणतात.

हाहुलि–महाराज, हे आपले रूपसिंग नव्हेत. कोणी पुरुषवेष घेऊन राहिलेली दुष्ट स्त्री आहे. महाराजांच्या विरुद्ध हिचा कांहीं तरी दुष्ट हेतू असावा. नाहीं तर वेषांतरानें महाराजाजवळ राहण्याचा हिचा दुसरा कांहीं मतलब दिसत नाहीं. कदाचित् जयचंद महाराजाकडून सरकारला अशा रितीनें दगा करण्याला या हेराची योजना झाली असेल!

पृथ्वी०–( रागानें लाल होऊन ) काय! हे रूपसिंग नव्हेत, कोणी वेषधारी स्त्री आहे. अरे अधमा जयचंदा? खरोखर स्त्रीचरित्र देवादिकांना देखील कळत नाहीं म्हणतात. त्याचें हें पहा प्रत्यक्ष प्रमाण! काय हें या स्त्रीचें धाडस!

रूप०–महाराज, मी स्त्री आहे एवढें मात्र खरें, बाकी जो दोषारोप माझ्यावर या अधमानें केला तो मात्र निव्वळ खोटा! वेषांतरानें मी आपल्याजवळ राहिले हा माझा अपराध खरा? मी महाराजाशीं इमानें इतबारीनें चाकरी केली आहे.

पृथ्वी०–होय रूपसिंग आमच्याशीं अगदीं विश्वासानें वागलें आहे. बरें तर तुझें नांव काय, आणि वेषांतरानें राहण्यांत तुझा हेतू काय?

रूप०–आतां महाराजांच्या चरणाजवळ चोरून ठेवूं कशाला? महाराज, ही आपली अभागी कर्नाटकी दासी रूपावती होय? दोन वर्षांमागें महाराजांची या दासीवर अप्रीति झाल्यामुळें मी दिल्ली शहर सोडून कनोज येथें जाऊन

राहिलें. त्या ठिकाणीं राजकन्या संयोगितेचा मला आश्रय मिळाला; तारादासी ह्मणून मी तिच्या जवळ असतां, आह्मा दोघींचें अत्यंत प्रेम जडलें. ती मला क्षणभर देखील विसंबत नसे. तेथें असतां, तिला मी सरकारच्या पुष्कळ पराक्रमाच्या, औदार्याच्या वगैरे गोष्टी कधीं कधीं सांगत असे. पुढें यज्ञसमारंभ होऊन, त्यांचा, कहरकंठीर नामक एका सरदाराशीं विवाह करून देण्याचें जयचंद महाराजानीं ठरविलें. परंतु बाईसाहेबानीं त्यांना नाकारलें; आणि शेवटीं एके दिवशीं आपल्या दुःखावेगांत त्यांनीं आपलें महाराजावरच्या प्रेमाचें हृद्गत् मजजवळ सांगितलें. तेव्हां प्रेमामुळें मलाही त्यांच्याबद्दल अत्यंत वाईट वाटलें आणि मी आपले मनोरथ खचित् शेवटास नेईन असें त्यांनां वचन दिलें. पण कहरकंठीराचा बाईसाहेबांनीं धिःकार केला, याला कारण मी; मीच त्यांचें मन बहकवितें, असें जयचंद महाराजांस त्या नीचानें सांगून माझ्यावर मोठें संकट आणण्याचा प्रयत्न केला होता, परंतु मी त्यांतून सुटून माझ्या प्रियधनिनीचें प्रिय करण्याकरितां रूपसिंग होऊन सरकारच्या चरणाजवळ आलें. आणि पुढें मी कशा रितीनें वागलें या बद्दलची सर्व हकीकत सरकारास विदित आहे. जें काय दुष्ट कृत्य माझ्या हातून झालें तें हेंच. आतां याबद्दल पाहिजे तर सरकारांनीं माझा शिरच्छेद करावा. माझ्या धनिनीस आणि सरकारास दिलेलें माझें वचन देवाच्या कृपेनें पूर्ण झालें आणि फार दिवस अंतरलेल्या सरकार चरणाचा पुनः आश्रय मिळून या दासीस त्यांची थोडी

सेवाही घडली. आतां माझी कोणतीही इच्छा राहिली नाहीं. या नीचानें मात्र संधी साधून आज रात्रीं एकदम माझ्यावर घाला घातला. याच्या दुष्ट वासनेला मी कबूल झालें नाहीं, म्हणून मी जयचंदाचा गुप्त हेर आहे, असा माझ्यावर यानें विनाकारण आरोप केला; आणि हा माझ्यावर बलात्कार करण्यास तयार झाला होता. इतक्यांत जर सरकार स्वारी आली नसती तर मी या लांडग्याच्या दुष्ट वासनेस बळी पडलें असते! हीच माझी खरी हकिकत. आज जसा हा मजवर प्रसंग या नीचानें आणला, तसाच प्रसंग दोन वर्षांमागें सरकार स्वारी शिकारीस गेल्यावर कायमाष प्रधानजीनें विषयांध होऊन आणला होता; आणि त्याचमुळें मी सरकारच्या प्रेमास मुकलें.

पृथ्वी–शाबास, रूपावती शाबास! तुझ्यावरच्या माझा सर्व राग गेला.

हाहुरी–महाराजांची मुख्य नाटकशाळा जी रुपावती तीच ही. अं. केवढा माझ्या हातून अविचार झाला. आतां काय होईल तें होवो!

पृथ्वी– ( हाहुरीरायाकडे पाहून ) अरे दुष्टा अशा रितीनें या स्त्रियेवर बलात्कार करण्याला तुझें मन धजलें कसें? असें किती अबलांचें पातिव्रत्य तूं भ्रष्ट केलें असशील! इतका तूं अधमाधम असतील असें वाटलें नव्हतें. तुझ्यासारखे मोठ्या पदावर चढलेले लोक जर असा गरिबावर जुलूम करूं लागेल, तर त्यांची काय दशा व्हावी? खरें म्हटलें असतां तुम्ही त्यांचें रक्षण करावयाचें, तें सर्व एका बाजूस ठेवून असलीं घोर कृत्यें तूं करूं लागलास तेव्हां

तुझ्या आधमपणाची आणि पाजीपणाची कमाल झाली ह्मणायाची; धिःकार असो तुझ्या मोठेपणाला, आणि पाजीपणाला ! देवा, असले नरपशु माझ्या राज्यांत आणि त्यांतून माझ्या सामंत सरदार मंडळींत आहेत अः ?

हाहुरी—सरकार ही कोणी तरी गुप्त हेर असेल अशी माझी कल्पना होती.

पृथ्वी असा जर तुला संशय आला होता, तर ही गोष्ट तूं माझ्या कानांवर कां घातली नाहींस ! चोरासारखा अपरात्रीं दरोडा घातलास यांत काय मोठा पुरुषार्थ मिळविलास. मूर्खा, आज तूं असलें नीच कृत्य केलेंआहेस कीं, त्यामुळें मला आणि माझ्या मंत्री मंडळीला तूं मोठीलांज आणलीस. या कृत्याबद्दल तुझा छिरच्छेद केला पाहिजे; पण पूर्वीं तूं एक दोन वेळां चांगली कामगिरी बजावली आहेस, मोठें शौर्य दाखविलें आहेस ह्मणून तुला जिवंत सोडतों. तुझें नांव माझ्या मंत्री मंडळींतून काढून टाकलें आहे. शिवाय हिचा तूं मोठा अपराध केलास या करितां हिच्या पायापडून हिची क्षमा माग.

हाहुरी– ( तिच्या पाया पडतो आणि क्रोधानें मनाशीं म्हणतो ) बरें आहे !

पृथ्वी—नीच माझ्या समोरून चालता हो. सध्यां तुला एवढी शिक्षा पुरे आहे. पुन्हां अशी गोष्ट जर माझ्या कानावर आली तर शिरच्छेद करीन. यापासून तरी मोठ्या लोकांनीं कसें वागावें हें चांगलें शीक.

( हाहुरीराय रागानें निघून जातो )

( रूपावती कडे वळून ) रुपावती, शाबास आहे तुझ्या

धैर्याची आणि चातुर्याची. तुझ्या सर्व अपराधाची मी क्षमा केली आहे.

रूप०-मी हेंच बाक्षिस मागणार होतें तें सरकारांनीं मागण्याच्या पूर्वींच मला दिलें. आतां मला कांहींएक नको. सरकारचें मन गंभीर, मायाळू आणि स्वच्छ गंगेच्या पाण्याप्रमाणें निर्मळ आहे हें मला माहित होतें ह्मणूनच मला हें साहस करण्याचें धैर्य आलें !

पृथ्वी-चल. रात्र ही फार झाली. तुझी मैत्रिण तुझ्या भेटीकरितां अत्यंत उत्सुक झाली. जा तिला भेट आणि दोघीजणी सुखानें आणि प्रेमानें आनंदांत रहा. आतां तुला दुःखाचें वारेंसुद्धां लागणार नाहीं.

( सर्व जातात )

---

## प्रवेश ४ था.

---

स्थळ—बागेबाहेरील मैदान.

पात्रें --( कन्हराय आणि हाहुरीराय येतात )

हाहुरी-( रागानें ) कन्हराय, आतां या राज्यांत अशा रितीचा अपमान सोसून, निर्लज्जपणानें एक क्षणभर देखील राहण्यांत अर्थ नाहीं; आणि या बाबतींत कृपा करून तुम्ही मला आग्रह करूं नका. त्या वेळेसच महाराजांनीं आपल्या हातानें जर माझा शिरच्छेद केला असतां, तर त्याचें मला यत्किंचितही दुःख झालें नसतें.

पण तिच्या पायां पडायला लावून, तिची क्षमा मागायला त्यांनीं लाविली, आणि त्या वेळेस ती दुष्ट, आपला जय झाला असें समजून माझ्याकडे पाहून जी हंसली, त्यामुळें माझ्या ऱ्हदयाला जी मोठी जखम झाली आहे ती या जन्मांत तर आतां बुजणार नाहीं. अहो, ज्यानीं रणांत कित्येकवेळां आपलीं शिरें हातावर घेऊन, महाराजाकरितां आपले जीव धोक्यांत घातले, ज्यांनीं आजपर्यंत गादीची एकनिष्ठपणें सेवा केली, महाराजांचा यशध्वज सर्व भरतखंडभर फडकावण्यास जे कारण झाले; त्या एकनिष्ठ सेवकाची, त्यांच्या इमानीपणाची त्याच्या राजभक्तीची, महाराजांनीं यःकिश्चित् कवडीमोल वेश्येच्या बोलण्यावर विश्वास ठेवून अशी चीज करावी आणि आम्हाला तिच्यापुढें नाक घासायला लावावें, हें महाराजांना योग्य वाटतें ?

कन्ह०—मित्रा, जरा शांत हो ! कयमाष प्रधानजीनें अविचारानें याच रूपवतीवर नजर ठेविल्यामुळें, त्यांना हिच्यापायीं देहान्त प्रायःश्चित भोगावें लागलें हें तूं कसें विसरलास ? बरें, महाराजांच्या गादीला आपण सेवकांनीं पाय लावणें हें चांगलें काय ?

हाहुरी-पण हें कोणा लेकाला माहित होतें. चुकून जर एखादा अपराध घडला तर त्याबद्दल ही एवढी शिक्षा !

कन्ह०—म्हणूनच तुला सांगतों कीं, जरा धीर धर ! महाराजांचा राग शांत झाला म्हणजे मी हलकेच प्रसंग पाहून गोष्ट काढून तुझ्याबद्दल माफी मागून घेईन.

हाहुरी—तसें जरी झालें तरी ती अवदसा जोंपर्यंत दिल्ली शहरांत आहे, तोंपर्यंत मी नाहींच राहणार ! येथें राहून

सगळ्या कडून फटफजिती करून घ्यावी, तिनें माझ्याकडे पाहून नेहमीं हांसावें, थट्टा करावी आणि तें मीं निमूटपणें सहन करावें; इतका बेशरम आणि अभिमानशून्य अद्याप मी झालों नाहीं. या चांडाळणीचा आतां पुरा सूड घेतल्याशिवाय मी कधींही राहणार नाहीं. याबद्दल माझें सर्वस्व जाऊन माझे प्राण जरी गेले तरी मला त्याची बिलकुल परवा नाहीं.

कन्ह०–मित्रा, काय हें तूं बोलतोस! मला वाटतें तुला वेड लागलें आहे!

हाहुरी०–हो. या अपमानाच्या असह्य दुःखानें मी शुद्ध वेडा बनून गेलों आहे?

कन्ह०–बरें, पुढें तूं जाणार कोणीकडे, आणि करणार काय? या असल्या अविचारानें तूं आपल्या हातानें आपल्यावर जास्त संकट मात्र ओढून घेत आहेस.

हाहुरी०–( बेपरवाईनें ) मी आतां या अपमानाचें उसनें फेडण्याकरितां वाटेल तें करीन! मला सर्व जग मोकळें पडलें आहे. ज्याठिकाणीं खऱ्या स्वामीभक्तीचें आणि प्रामाणिकपणाचें असें बक्षीस मिळतें, तेथें राहून करायाचें! काय? याचा खरा परीक्षक मला जेथें भेटेल तेथें जाईन.

कन्ह०–मित्रा, ज्यांचें आपल्या पूर्वजांपासून आपण अन्न खात आलों, ज्यांच्यावर आपलें सर्व सौख्य अवलंबून, ज्यांच्यामुळें जनांत आपली प्रतिष्ठा; त्या आपल्या अन्नदात्याशीं तूं द्रोह करणार? छे,छे, अशी गोष्ट मनांत सुद्धां आणूं नकोस! त्यामुळें सर्व जगभर तुझी अपकीर्ति होईल. जन्माला येऊन आपल्या पूर्वजाचें यश रक्षण करणें,

आणि नवीन कीर्ति संपादन करणें हेंच खरें भूषण, आणि हेंच त्यांचें सार्थक !

हाहुरी०-बाबा, त्या सर्व गोष्टी खऱ्या ! आतां त्याचा कांहीं एक उपयोग नाहीं. माझा निश्चय झाला तो झाला ! मी कांहीं येथें राहणार नाहीं.

कन्ह०-तुझा दृढनिश्चयच झाल्या सारखा दिसतो. माझ्या स्नेह धर्माला स्मरून तुला जें काय मला सांगायचें होतें तें मीं सांगितलें; यावर तुझी मर्जी ! येतों मी ? जेणें करून तुला पुढें पश्चात्ताप होईल अशी कृति करूं नको, एवढें लक्षांत ठेव ह्मणजे झालें. एकदां हातांतून बाण सुटून गेल्यावर तो परत घेण्याचा प्रयत्न व्यर्थ होय,(जातो.)

हाहुरी-( मनाशीं ) आपल्यावर जोंपर्यंत वेळ येऊन बेतली नाहीं, तोंपर्यंत नुसत्या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी दुसऱ्याला पुष्कळांना सांगता येतात; पण स्वतांवर बेतली कीं, तें ब्रह्मज्ञान मग पार नाहिंसें होतें. त्या अपमानामुळें, माझा क्रोधाग्नि भडकून त्यानें माझ्या अंगाची अगदीं लाही करून टाकली आहे. याचें उसनें कसें फेडावें हें यापुढें मला कांहीं सुचत नाहीं. मंत्री मंडळींतून माझें नांव काढून टाकल्यावर, ज्या ठिकाणीं आपण अमीरी गाजविली त्या ठिकाणीं खालीं मान घालून फकिरी पतकरून माशा मारीत रहाणें ह्मणजे निव्वळ भागुबाईपणा ! यापेक्षां देशत्याग केलेला सर्वोत्कृष्ट. ज्याच्या बाहूंत शौर्य नसेल, ज्याच्या अंगांत धमक नसेल, ज्याच्यामधलें क्षात्रतेज नष्ट झालें असेल, त्यानें पाहिजे तर अशा ठिकाणीं मेल्याप्रमाणें पडून राहावें ! या बहाद्दराच्या हातून तें कधीं होणार नाहीं. बाहेर तर

मी पडलोंच ! आतां कोणीकडे बरें जावे ! [ अंमळ विचार करून ] बस्स, असेंच करावें ! महंमह शहाबुद्दीन गोरीनें जेव्हां मागें स्वारी केली होती, त्यावेळीं महाराजांनीं त्याचा लढाईंत पुष्कळवेळां पराभव केला आहे, त्यावेळेपासून त्याचाही क्रोधाग्नि धुमसत आहे; आणि तो आपला डाव केव्हां साधेल म्हणून पहात आहे; तेव्हां आतां त्याच्याच दरबारीं जावें। तो मला खास आश्रय देईल. त्याजवळ राहिल्यानें पुढें मागें माझा हेतू तडीस नेण्याची आणि महाराजांना समरंगणांत दोन हात दाखवून या हाहुरीरायामध्यें काय पराक्रम आहे हें दाखविण्याची केव्हांना केव्हां तरी संधी अल्याशिवाय राहणार नाहीं. माझ्या संपत्तीला, माझ्या जन्म भूमीला आणि या हस्तनापुराला आतां माझा हा शेवटचाच नमस्कार !

( असें म्हणून जातो )

पडदा पडतो

**अंक ३ समाप्त.**

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

स्थळ–दिल्ली शहराजवळच्या पहाडावरील एका गुहेसमोरील सपाट जागा.

( विजयराय चालुक्य तापसी वेषानें येतो. )

विजय–( आपल्याशीं ) आमच्या महाराजांच्या विषयांधपणामुळें राज्यांत चाललेली बंडाळी, लोकांवर होत असलेला जुलूम, लुच्चे, दगेखोर पाजी वगैरे लोकांच्या सुळसुळटानें पौर जनांच्या जिविताची आणि अब्रूची प्रत्येक क्षणोक्षणीं होणारी दुर्दशा, माझ्यानें पहावेना ह्मणून मी सर्व वैभवावर लात मारून दिल्लीस शेवटचा नमस्कार केला आणि या पहाडावर येऊन राहिलों; त्यामुळें मी मोठ्या आनंदांत आहे. येथें मला काय कमी आहे ! पुर्वीं जसा भाट, बंदिजन, आणि वारांगनांच्या मधुर नृत्य गायनानें मला आनंद होत असे, तसा येथें आतां या पक्ष्यांच्या सुस्वर शब्दानें होत आहे. तेथें असतांना जसा मी माझ्या इष्ट मित्रांच्या समागमांत वेळ घालवीत असे, तसाच येथें या माणसाळलेल्या हरिण, गायी, लहान लहान खिल्लारें यांच्या समागमांत आनंदानें काळ काढित आहे पूर्वीं चांगलीं उत्तम उत्तम प

क्षानानें आपली क्षुधा भागवीत असे, आतां त्या ऐवजीं येथें मला रोज नवी नवी गोड फळें मिळतात. जर माझ्या राजबालेची दुःखद आणि कष्टमय स्थिती माझ्या डोळ्यांपुढें नसती, तर माझ्या सारखा अत्यंत सुखी असा प्राणी जगांत विरळा ! या वानप्रस्थाश्रमांत ही पोरगी माझ्या करितां किती कष्ट भोगते, माझी प्रकृती किती संभाळते. आपलें दुःख एका बाजूला ठेवून माझें किती समाधान करते ! भगवंता, इतक्या अल्पवयांत या माझ्या प्रियकन्येवर तूं वैधव्य दुःखाचें दुर्धर संकट कां आणलेस ! महाराज, आपल्या करितां किती जणांनीं कष्ट भोगले आणि कितीजण भोगीत आहेत याचा आपल्याला विसर कसा पडला ! ( सुस्कारा टाकतो ) नको नको, त्याविषयीं आतां मनांत विचार आणणेंच नको ! जों जों मी जास्त विचार करूं लागेन, तों तों मागील सर्व गोष्टींच्या आणि सध्यांच्या विलक्षण राज्यस्थितीच्या वारंवार स्मरणानें माझें मन बहकून मी वेडा होईन. भगवन्, भगवन्, ( इकडे तिकडे पहातो ) अरे, तो त्या पलीकडच्या वेलीकडून कोण बरें येत आहे ! या जंगलांत दुसरा मनुष्य येतो कशाला ! असाच कोणी माझ्यासारखा या राज्यस्थितीला वैता गलेला प्राणी असेल झालें !

( इतक्यांत प्रवाशी वेषानें चंदबरदाई येतो )

**चंद०**—महाराज, दिल्ली शहराला जाण्याला जवळची वाट कोणती?

**विजय०**—त्या पलिकडच्या बाजूनें जी पायवाट जाते तीच.

**चंद०**—येथून शहर किती लांब आहे.

**विजय०**—पांच सहा कोस आहे ! महाराज, आज कोणाकडून

आलांत !

**चंद०**–मी फार लांबून आलों ! आज जंगलांत रस्ता चुकलों, वाट शोधीत भटकत भटकत त्या वरच्या कड्यावर आलों. तेथून आपल्याला मीं पाहिलें, तेव्हां आपल्याला रस्ता विचारावा ह्मणून इकडे आलों ! या डोंगरावरचे कित्येक कडे फार अवघड आहेत ! जरा पाऊल इकडे तिकडे पडलें कीं, रसातळालाच मनुष्य जायचें ! कृपा करून आपण मला रस्त्याला लावाल तर आपले मजवर मोठे उपकार होतील. सूर्यास्ताच्या आधीं मी आपल्या मुक्कामाला जाऊन पोंहचेन.

**विजय०**–हें पहा आभाळ अगदीं भरून आलें आहे; सरासरी एक प्रहरभर दिवस असेल नसेल. इतक्या वेळांत तुम्ही दिल्लीस जाऊन पोंहचाल असें मला वाटत नाहीं; आणि अशा वेळेला आपल्याला जाऊं देणें हें मलाही योग्य वाटत नाहीं, करितां येथून जवळच माझी गुहा आहे तेथें आपण चला, थोडासा फलाहार करून रात्रभर चांगली विश्रांति घ्या, आणि उद्यां सकाळीं पुढें जा. आपण या जंगलांत फिरून फिरून अगदीं दमून गेलां आहांत असें दिसतें; तेव्हां मीं केलेली विनंति आपणास मान्य होईल असें मला वाटतें. अहो या जंगलांत आधीं येतो कोण ? मग त्याचा समागम होणें तर लांबचीच गोष्ट ! बरें तेथें जाऊन तरी आपण करणार काय ? विनाकारण एकाद्या संकटांत मात्र पडाल. सध्यांच्या स्थितीप्रमाणें या जंगलांत राहणें जितकें सुखकारक आहे तितकें दिल्ली शहरांत नाहीं. येथील हिंसक जनावरें एकादे वेळीं जी दया करतील तितकी देखील तेथील दुष्ट पाजी लोक करणार नाहींत.

**चंद०**–( चकित होऊन ) याचा अर्थ काय ? हा दिल्ली शहरासंबंधानें अशी हकिकत सांगतो, तेव्हां हा कांहीं खरा

तापसी नव्हे. आज सात आठ महिन्यांत मला तिकडील कांहीं वर्तमान कळलें नाहीं, तेव्हां आजची रात्र येथें घालवून याच्याकडून कांहीं बातमी लागली तर पाहूं !

**विजय**०–काय आपण माझी विनंति मान्य करीत नाहीं ? माझ्याविषयीं आपणाला बिलकूल शंका येऊं देऊं नका.

**चंद**०–छे, छे, तसें कांहीं नाहीं. आपण इतक्या प्रेमानें आग्रह करीत असतां आपला शब्द माझ्यानें कसा मोडवेल.

**विजय**०–चला तर, आपल्या समागमाचा आज मला हा मोठाच लाभ आहे.

( दोघे जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—अरण्यांतील रस्ता.

पात्रें—( विजयराय आणि चंदबरदाई येतात ).

**विजय**०–मित्रा, तुला जी मीं हकिकत सांगितली त्यावरून सध्यां दिल्लींतील स्थिति किती भयंकर आहे याची कल्पना तुला झालीच असेल. बहुतेक मंडळीनें तर हात टेंकलेच ! महाराज शुद्धीवर येण्याबद्दल आतां सर्वांची निराशा होऊन चुकली ! तूं महाराजांचा जिवलग स्नेही आहेस, स्पष्ट बोलणारा आहेस, तेव्हां ईश्वरकृपेनें आणि सर्वांचें दुर्दैव जर संपलें असेल तर तुला यश येईल आणि राज्यावरचें मोठें संकट टळेल.

**चंद**०–विजयराय, या पंथाला गोष्ट येईल असें माझ्या स्वप्नांत सुद्धां आलें नव्हतें. असो, आपलें कर्तव्यकर्म आपल्याला बजावलेंच पाहिजे. येतों मी.

**विजय**०–ठीक आहे, परमेश्वर तुला यश देवो. या रस्त्यानें गेलास म्हणजे लवकर जाऊन पोंहचतील. रस्त्यानें संभा-

ऊन जा. चोरीचे हेर आणि त्याच्या टोळ्या चहूंकडे हिंडत आहेत.

( दोघे परस्पर भेटतात. विजयराय जातो ).

चंद०–( आपल्याशीं ) विजयरायाची हकीकत ऐकून त्याची आणि त्याच्या त्या सुकुमार राजबालेची दुःसह स्थिति प्रत्यक्ष पाहून माझें हृदय दुःखानें अगदीं करपून गेलें आहे. जे नेहमीं सन्निध राहणारे, राज्यमंदिराचे केवळ आधारस्तंभ, गादीचे एकनिष्ठ सेवक, अग्नितेजाप्रमाणें ज्यांची स्वामिभक्ति प्रखर, कसलाही आणीबाणीचा प्रसंग येवो, जे आपलीं शिरें हातांवर घेऊन धन्याच्या जिवासाठीं जीव देण्यास नेहमीं तयार, त्या इमानदार आणि शूरांची जर ही दशा तर इतरांची कथा काय ? मग अशा स्थितींत माझें स्मरणही त्यांना झालें नाहीं यांत नवल कसलें ! राजा, ज्या महावीरांनीं तुझ्या सुखाकरितां आपल्या या जगांतील सर्व सुखांवर पाणी सोडून समरांगणांत देह ठेविले, ज्यांनीं तुझें दिगंत यश वाढविलें, तुझें नेहमीं प्रिय केलें, त्या वीरसिंहांच्या तरुण स्त्रियांनीं, वृद्ध मातापितरांनीं, लहान लहान बालकांनीं दोन प्रहरीं या रानांतील फळांवर आपल्या उदराची भरती करावी, वस्त्रालंकाराबद्दल अंगाला राख फासून रहावें, आणि आपल्या प्राणाच्या आणि त्याहून प्रिय अशा आपल्या अब्रूच्या रक्षणाकरितां रानावनांत लपून राहून आपलें आयुष्य कंठावें, आणि तूं सदोदित विषयसुखांत निमग्न होऊन त्यांची दाद सुद्धां घेऊं नयेस, यापेक्षां तुझा आणखी कृतघ्नपणा तो कोणचा ! शिव, शिव, अशा किती मोठ्या कुलांचा नाश झाला असेल, अशीं किती कुटुंबें देशोधडीला लागलीं असतील कोण जाणे ! भगवन् सर्वांचें नष्टचर्य एकदम कसें ओढवलें ! ( अंमळ थांबून ) याबद्दल माझा शिरच्छेद झाला तरी

बेहत्तर, पण जोंपर्यंत हें राज्यरूपी तारूं महाराजाच्या तुफान झालेल्या विषयसमुद्रांत भडकून खडकावर जाऊन आपटलें नाहीं, तोंपर्यंत सुरक्षितपणें तीराला लावण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

( जातो. )

## प्रवेश ३ रा.

स्थळ–दिल्ली शहरांतील कन्हराय सेनापतीच्या वाड्यांतील दिवाणखाना.

पात्रें–( कन्हराय आपल्याशीं विचार करीत बसला आहे, जवळ कांहीं पत्रें पडलीं आहेत. )

**कन्हराय**–( आपल्याशीं ) महाराजांचें मन पूर्वस्थितीवर येण्याला आतां काय युक्ति करावी. या ठिकाणीं आपली अक्कल अगदीं चालत नाहीं. संयोगिताबाईसाहेबांचा आणि यांचा विवाह झाल्या दिवसापासून महाराज एक दिवस देखील दरबारांत आले नाहींत. राज्यकारभार पहात नाहींत. कोणाची भेट देखील घेत नाहींत. नवा नवा प्रकार आहे, तेव्हां हें असें होणें साहाजिक आहे; आणि आतां तो संपून महाराज लवकर कामकाज पहायला लागतील असें आम्हाला वाटलें होतें, परंतु तें सर्व व्यर्थ. येथें त्या नवीन प्रकारांत आणि नादीपणांत रोज कांहीं तरी नवीन भर पडते. या गोष्टीला आज नाहीं तरी जवळ जवळ सहा महिने होत आले. याच्यापूर्वीं आम्हाला कांहींशी आशा वाटत होती, परंतु आतां जों जों एकेक नवीन प्रकार पहावा तों तों आमची अगदीं निराशा होत चालली आहे. हा प्रकार आणखी कांहीं दिवस चालला तर याचा परिणाम किती भयंकर होईल

हें माझ्यानें सांगवत नाहीं. नाना तऱ्हेचे विलास, क्रीडा, संयोगिताबाईसाहेब, आणि त्यांचा महाल याशिवाय त्यांना कांहींएक सुचत नाहीं. जिकडे तिकडे स्त्रीराज्य झालें आहे. महाराजांच्या पूर्वस्थितीची ज्याला माहिती आहे, त्यानें जर ही त्यांच्यामध्यें इतकी बदल झालेली ऐकिली, तर त्याला हें खरें सुद्धां वाटणार नाहीं. सध्यां आम्हांवर संकटांचीं काळीं भोर ढगें चहूंकडून उठून व त्यांनीं इतक्या थोड्या अवकाशांत आम्हा सर्व प्रजाजनांचा आनंद-चंद्र कसा अगदीं लोपवून टाकला. आतां कोणत्या थराला ही गोष्ट पोंहचेल याची कल्पना सुद्धां करवत नाहीं. हें वादळ नाहींसें कसें होणार! ते कविराज जर या वेळेला असते तर कोणत्याही रीतीनें महाराजांच्या कानांवर हा अंदाधुंदीचा प्रकार घातला असता. त्यांचीही कांहीं खबर कळली नाहीं, त्यांच्या शोधाकरितां पाठविलेला मनुष्यही अद्याप आला नाहीं. हरहर—या.

( इतक्यांत एक शिपाई येतो. )

**शिपाई**–(हात जोडून) सरकार खालीं एक गोसावी आला आहे.

**कन्ह०**–बरें, त्याला मागल्या चोरजिन्यानें वरतीं पाठवून दे. ( शिपाई जातो ) पाहूं हा काय बातमी सांगतो ती !

( गोसावी येतो. )

**गोसावी**–राजा जयचंद याचा वकील आणि गोरी यांची दोन दिवसांपूर्वीं भेट होऊन दोघांचा मिलाफ झाला. तयारी कडेकोट आहे.

**कन्ह०**–असें काय! आणखी तेथें काय काय गोष्टी होतील त्यांची कच्ची हकीकत समजण्याची खटपट कर.

**गोसावी**–हुकूम–( जातो ).

( पुन्हां शिपाई येतो ).

**शिपाई**–महाराज, दुसरा एक भिकारी आला आहे.

**कन्ह०**–हं: त्याला त्याच रस्त्यानें येऊं दे. (शिपाई जाऊन भिकाऱ्याला घेऊन येतो.)

**भिकारी**–दान देना, रोटी खिलाना, और बात सुनना.

**कन्ह०**–बोल काय बातमी आहे ?

**भिकारी**–शहाबुद्दीन गोरीच्या जलालखा सरदारानें हसार, भटनेर, बलर वगैरे शहरें लुटून उध्वस्त केलीं; आपल्याकडील सरदार हाहुलीराय गोरीच्या दरबारीं गेले, त्यांचा गोरीनें मोठा सन्मान केला.

**कन्ह०**–ठीक आहे, नीट सावधगिरीनें आणि हुशारीनें राहून आणखी काय काय वर्तमान होईल तें कळीव जा. (तो जातो.) (रागानें) अरे दुष्टा, अधमा, शेवटीं राजद्रोहाच्या पातकानें आपल्या पातकाची भरती केलीस अं! कोण नीच, राक्षस, लोक हे;

(शिपाई येतो)

**शिपाई**–सरकार खालीं कोणी एक स्त्री आली आहे, आणि ती कांहीं महत्त्वाच्या कामाकरितां आतांच भेट व्हावी ह्मणून ह्मणते.

**कन्ह**–(आश्चर्यानें) काय स्त्री! हिचें काय काम असावें? बरें तिला या वाटेनें घेऊन ये. (शिपाई जाऊन एका बुरखा घेतलेल्या स्त्रीला घेऊन येतो.)

**स्त्री**–महाराजांचा जयजयकार असो.

**कन्हराय**–बाई तुमचें नांव काय! कोण तुह्मी!

**स्त्री**–(हात जोडून) सरकार मी येथील एक वेश्या आहें. नृत्यगायन करून गादीची चाकरी करतें.

**कन्ह०**–असें काय? काय तुमचें काम आहे?

**स्त्री**–सरकार, मी उत्तरदरवाजाजवळच्या एका गल्लींत राहतें. माझें घर त्या गल्लीच्या अगदीं शेवटीं कोटास लागून आहे. कालरात्रीं चहूंकडे सामसूम होऊन मध्याह्नरात्र उलटून गेल्यावर माझ्या घराच्या मागील दारच्या एका

पडक्या बाजूला दोन परके गृहस्थ बराच वेळ कांहीं खलबत करीत होते. त्यांचें बोलणें काय चाललें होतें हें मला कळलें नाहीं. गस्तवाल्या शिपायांचा आवाज ऐकला किंवा आजूबाजूला कांहीं कुजबुजलें तर ते लागलेच घाबरून दडून रहात, त्यावरून ते कोणी तरी हेर असावे असें मला वाटलें. परवां जी दवंडी पिटली त्यावरून ही हकिकत महाराजांस विदित करावी ह्मणून मी आलें.

कन्ह०—बाई, तूं वेश्या असून आपल्या स्वामिभक्तीला जागलीस हें फार चांगलें केलेंस ! अरे कोण आहेरे बाहेर ( शिपाई येतो ). हिला खजिनदाराकडून पांच मोहरा इनाम देवव. जा. ( शिपाई आणि वेश्या जातात ). याप्रमाणें प्रत्येकजण जर आपापल्या स्वामिभक्तीला स्मरून वागेल तर अशा जयचंदासारख्या आणि त्या शिखानष्टासारख्या शेंकडोंजणांचें काय चालणार. आपल्या अन्नदात्यावर उठणारे निमकहराम या जगांत आहेत अं ! पहा यःकश्चित् हलका धंदा करणाऱ्या वेश्येनें जें आपलें इमान दाखवावें, जी राजभक्ति दाखवावी, तितकीही या अधमांच्या ठायीं नसावी हें खरोखर आपलें दुर्भाग्य ! हा मूर्खा हाहुरीराया, या नीच वेश्येपेक्षांही तूं नीच आहेस ! आजपर्यंत या कृष्णसर्पाला महाराजांनीं व्यर्थ पाळला ! ! धिक् धिक् तुझें जिणें ! ! !

( शिपाई येतो. )

शिपाई—सरकार, कोतवालसाहेबांनीं एक संन्यासी पकडून आणला असून त्याचा न्याय आपल्या समोर व्हावा असें ते ह्मणतात.

कन्ह०—काय, संन्याशाला पकडून आणलें आहे; बरें येऊंदे त्यांना वर. ( शिपाई जातो ) हें काय बरें आश्चर्य !

(कोतवाल एका मुसक्या बांधलेल्या संन्याशास घेऊन येतो).

कोत०—सरकार—

कन्ह०—कोतवाल सोडा त्याच्या मुसक्या. या संन्याशानें काय केलें आहे? याला काय ह्मणून पकडलें? यती, ब्राह्मण, तापसी, गरिबगुरिब वगैरे लोकांना कोणत्याही रीतीनें त्रास देऊं नये ही महाराजांची आज्ञा तुह्मी विसरलांत काय?

कोत०—सरकार, तसें कसें होईल. हा खरा संन्यासी नव्हे, याचा वेष मात्र संन्याशाचा आहे.

कन्ह०—तर मग हा कोण आहे?

कोत०—हा मुसलमान असून हेर आहे. या वेषानें हा शहरांत टेहळणी करीत हिंडत होता.

कन्ह०—हा तुह्माला कसा सांपडला?

कोत०—हा ठाकुरजीच्या देवळांत गेला असतां तेथील पहारेवाल्यानें याला पकडलें. याच्या चालण्यावरून आणि नजरेवरून प्रथम त्याला थोडासा संशय आला होता; मग जेव्हां हा देवळांत दर्शनाकरितां गेला तेव्हां यानें प्रथम ठाकुरजीच्या पुढें एकदम गुडघे टेंकून मग डोकें टेंकलें. त्यावरून त्याचा संशय जास्त दृढ होऊन त्यानें याला पकडून दरडावून विचारलें. तेव्हां याच्या तोंडून एकदम "अल्ला" असा शब्द निघाला. आपणाला यानें ओळखलें आणि आपण आतां पकडलें जाऊं, असें समजून यानें छातींत लपविलेला सुरा काढून त्याला जखमी केलें. मग तेथील दुसऱ्या लोकांनीं लागलेंच याला पकडलें. यानें कबूल व्हावें ह्मणून आह्मीं पुष्कळ खटपट केली; परंतु त्या वेळपासून याच्या तोंडांतून एक अक्षरही निघालें नाहीं.

कन्ह०—शाबास, तुह्मीं सर्वांनीं चांगलें काम केलें. या हरामखोरानें आमच्या ठाकुरजीचें मंदिर विटाळलें अं! जा शहराबाहेर नेऊन याचा शिरच्छेद करा, आणि वेशीवर याचें शिर लटकत ठेवा, ह्मणजे दुसऱ्या लोकांवर चांगला वचक बसेल. कोतवाल, शहरांत मुसलमान लोक पुष्कळ आले

आहेत व ते गुप्तपणानें टेहळणी करीत हिंडतात, अशी मला बातमी लागली आहे. तर सर्वांचा तपास लावून त्यांना चांगल्या शिक्षा करा. अगदीं हयगय कामाची नाहीं, समजलांत, नीट बंदोबस्त ठेवा.

**कोत०**–हुकूम सरकार, (संन्याशासह कोतवाल जातो ).

**कन्हराय**–( आपल्याशीं ) काय या शत्रूंच्या हिकमती; त्यांची तशी तयारी, आणि आमच्या येथचा हा प्रकार, आतां पुढें निभाव लागावा कसा !

( इतक्यांत पडद्यांत शब्द होतो ).

( " पृथ्वीराजा, हिंदुधर्म ठार बुडालारे बुडाला. यवनांनीं सर्व लुटलें. हिंदुधर्माचा वाली कोणीच राहिला नाहीं काय ! बुडाला, बुडाला हिंदुधर्म ठार बुडाला ").

**कन्ह०**–( चकित होऊन शिपायाकडे पाहून ) अरे खालीं काय गडबड आहे ती पहा बरें ! ( शिपाई जातो ). हें दुसरें संकट आलें कोण जाणे !

( शिपाई येतो. )

**शिपाई**–सरकार, मथुरा, गोकुळ, वृंदावन, येथील चोबे तसेच यात्रेकरू, वगैरे गरिब लोकांना घोरीच्या लोकांनीं लुटलें, मारलें, त्यांचे अतिशय हाल केले, ह्मणून ते दाद मागण्याकरितां आले आहेत.

**कन्हराय**–अरेरे, शेवटीं येथपर्यंत गोष्ट आली काय ! आतां मात्र कळस झाला. जा त्या सर्वांना वर घेऊन ये. (तो जातो, आणि गिरधर प्रसाद, कृष्णंभट दीक्षित, उघडेबोडके जखमा लागलेले रक्तबंबाळ झालेले असे येतात.)

**शिपाई**–हे आमचे सेनापती महाराज बसले आहेत. या असे, सांगा सर्व तुमची हकीकत.

**कन्ह०**–(दुःखानें) काय यांची दुष्टांनीं दशा केली ही ! महाराज, आपल्यावर हा प्रसंग कुठें गुदरला ?

**कृष्ण०**–आह्मी सर्वजण नावेंत बसून गोकुळ, वृंदावनाच्या या-

त्रेला जात होतों. मथुरेच्या जवळ येतों तोंच आमच्यावर एका पांच पन्नास मुसलमानांच्या टोळीनें एकदम हल्ला केला, कित्येकांस त्या यमदूतांनीं ठार मारलें, कित्येकांस बाटविलें, कित्येकांस जखमा केल्या, कित्येकांस यमुनेंत बुडविलें, त्या ठिकाणीं आह्मां यात्रेकरूंची जी त्यांनीं नाना तऱ्हेनें विटंबना केली ती सांगतां येत नाहीं. हें सर्व हिंदुराज्य असून, पराक्रमी पृथ्वीराजा या देशावर राज्य करीत असतां, त्याच्या राज्यांत भर दिवसां यवनांनीं अशा रीतीनें जुलूम करावा, आणि त्याची दाद लागूं नये काय ! जर त्यांचा बंदोबस्त त्याच्या हातून होत नाहीं तर तो राजा झाला कशाला ? धिक्कार धिक्कार असो अशा राजाला आणि त्याच्या मंत्रीजनांला ! हिंदूंचा आतां कोणीच वाली राहिला नाहींना ! विश्वेश्वरा—

**गिरधर**–सब गोकुळ, वृंदावन, भ्रष्ट कर डाले; मूर्ती फोड डाली, हाय, हाय, अब हमारा, भगवत् बिना कोन सुने.

**कन्ह०**—महाराज, त्या दुष्टांना याबद्दल चांगलें शासन होईल, आणि आपल्याला असा पुन्हां त्रास होऊं नये ह्मणून चांगला बंदोबस्तही केला जाईल. ( शिपायाकडे पाहून ) अरे या सर्वांना औषधपाणी, अन्नवस्त्र वगैरे देववून यांची चांगली तजवीज ठेव. महाराज, आपण आतां निष्काळजी असावें.

**कृष्ण**–आपल्या हिंदु प्रजेचा आणि हिंदुधर्माचा जर तुह्माला कांहीं अभिमान असेल तर पहा ! अशा गोष्टी ज्या अर्थी घडूं लागल्या त्या अर्थी आमचा सर्वांचा काळ फिरला ह्मणायचा ! दुसरें काय ! !

( शिपाई मंडळीस घेऊन जातो. )

**कन्हराय**–( दुःखानें ) राज्यकारभाराकडे महाराजांचें दुर्लक्ष झाल्यामुळें, चहूंकडे काय गोंधळ उडाला याचें हें पहा प्रत्यक्ष उदाहरण ! आतां एक क्षणभर देखील स्वस्थ ब-

सून उपयोग नाहीं. काय करावें. ( स्तब्ध राहतो ) बस्स, माझा मित्र चामुंडराय याचा विचार घेऊन असेंच करावें ! त्याशिवाय आतां दुसरा मार्ग नाहीं.

( जातो. )

## प्रवेश ४ था.

स्थळ–दिल्ली शहरांतील तुरुंग.

पात्रें–( एका अंधारकोठडींत हातापायांत बिड्या घातलेला चामुंडराय पडला आहे, व जवळ कन्हराय बसला आहे. )

चामुंड०–मित्रा, या कानांनीं राज्यांतली ही स्थिति ऐकावीना ! मी आपल्या मनाला वारंवार आवरतों, आणि तिकडे लक्षच देऊं नये असा विचार करतों, पण राहवत नाहीं. चुगलखोर लोकांच्या रोजच्यारोज गोष्टी ऐकून महाराज प्रथम बहिरे झाले, मग सद्विवेक आणि सुविचार यांना पार घालवून देऊन विषयवासनेनें त्यांना अगदीं अंधळें बनवून टाकलें, जन्मांधाला जशी मग त्याची काठी वागवितें, त्याप्रमाणें सध्यां त्यांना ही नववधू वागवितें आहे.

कन्ह०–नुसती ही स्थिति ऐकण्याचेंच जर नशिबीं असतें, तर फार बरें झालें असतें; पण आतां प्रत्यक्ष अनुभवण्याची पाळी आली आहे. आमचीं शहरें लुटावीं, देवस्थानें भ्रष्ट करावीं, गरिबांस नाना तऱ्हेनें छळून त्यांची नाहीं ती विटंबना शत्रूंनीं करावी आणि ती आह्मीं जिवंत राहून प्रत्यक्ष पहावी, यापेक्षां आणखी आमच्या शौर्यशून्यत्वाची, आणि राज्यांतील अंधाधुंदीची दुसरी मोठी साक्ष ती कोणची पाहिजे. आज शुद्धीवर येतील, उद्यां शुद्धीवर येतील, असें समजून आजपर्यंत आह्मी स्वस्थ बसलों.

पण आतां वाट पहाण्याची अवधी राहिली नाहीं. बंदोबस्त तरी कोणच्या रीतीनें करावा. आज पांच पांच सहा सहा महिने झाले ,पगार न मिळाल्यामुळें बहुतेक लोक चाकऱ्या सोडून गेले. लुच्चे दरोडेखोर, व हलकट लोकांचा अंमल आणि जुलूम दिवसेंदिवस जास्त होत चालल्यामुळें कांहीं मोठे मोठे नगरशेट सभ्य लोक आपल्या मालमत्तेच्या आणि अब्रूच्या बचावाकरितां परराज्यांत जाऊन राहिले. कांहीं हाहुरी रायासारखे राजद्रोही लोक प्रत्यक्ष त्या यवनाला जाऊन मिळाले आहेत, आणि आमच्या येथील सर्व प्रकारची बातमी देऊन त्याला आमच्या नाशाकरितां मदत करीत आहेत. त्या यवनानें बहुतेक सभोंवतालचा प्रदेश तर लुटून फस्त केला. आतां त्यानें एकदम दिल्लीवर हल्ला करून आमच्या घरांतून शिरून आह्माला बांधून न्यायचें मात्र बाकी राहिलें आहे, आणि तेंही थोड्या दिवसांतच होईल. आणखी मोठ्या आश्चर्याची गोष्ट ही कीं, प्रत्यक्ष हिंदू राजे जे आमचे पूर्वी स्नेही होते ते या वेळीं त्याला सामील झाले आहेत, आणि त्यांत राजा जयचंदही आहे.

**चामुंड०**–काय ह्मणतोस राजा जयचंद त्याला सामील आहे ?

**कन्ह०**–इतकेंच नव्हे तर त्यानें महाराजांचा सूड उगविण्याबद्दल अगदीं प्रतिज्ञा केली असून तो सर्व प्रकारें घोरीला साहाय्य करीत आहे.

**चामुंड०**–मग तूं काय करायचें योजिलें आहेस ?

**कन्ह०**–मी उदईक प्रत्यक्ष महाराजांची हरतऱ्हेनें भेट घेऊन त्यांच्या कानांवर हा सर्व प्रकार घालण्याचा निश्चय केला आहे.

**चामुंड०**-ठीक, फार उत्तम ! कन्हराय, आपल्याला महाराजांचें यश संभाळणें, त्यांना शुद्धीवर आणणें, त्यांच्या हातून चुकून अन्याय होत असला तर तो न होऊं देणें,

त्यांना अनीतीपासून राखणें, वेळोवेळीं आपण आपल्या कर्तव्यास जागणें, आणि त्यांना जागृत करणें, हें आपलें कर्तव्य आहे. हें जर आपण निस्पृहतेनें केलें नाहीं, तर महाराजांबरोबर आपणही त्याबद्दल दोषी होऊं! कसें केलें तरी ते आपले धनी आहेत, आपण त्यांचें अन्न खातों, त्यांच्या कृपाछत्राखालीं वाढतों, आणि सौख्यानंदाचा उपभोग घेतों, तेव्हां राज्याच्या हिताकरितां, गादीकरितां, आणि त्यांच्या जिवाकरितां झटणें, अथवा प्रसंगीं प्राणही देणें हेंच आपणांस योग्य! आज नाहीं उद्यां ते शुद्धीवर येतील.

**कन्ह०**—या बाईसाहेबांच्या नादांत महाराज इतके निमग्न होतील, असें मला मुळींसुद्धां वाटलें नव्हतें. ह्मणजे पहा, जेव्हांपासून घोरीच्या हालचालीची आणि जयचंदाच्या स्वारीच्या तयारीची मला बातमी लागली, त्या वेळीं मीं समरसिंह रावळ यांस इकडील प्रकार कळवून सैन्यासह मदतीस बोलाविलें, त्याप्रमाणें त्यांना येथें येऊन आठ दिवस झाले; अद्यापपर्यंत त्यांच्या येण्याची वर्दी देखील महाराजांना पोंचली नाहीं, मग त्यांचें आगतस्वागत करणें तर दूरच राहिलें. दोन तीन वेळ मीं वर्दी पाठविली पण ती देवडीवरूनच परत आली, आणि आज त्या वर्दी घेऊन जाणाऱ्या जासूदाला त्याचा उलट जबाब बाईसाहेबांच्या दासीकडून पाठीवर घेऊन परत यावें लागलें. काय बाईसाहेबांनीं मोहनी घातली आहे कोण जाणे! सर्वजण ही संयोगिता नव्हे, तर वियोगिता महाराजांना मिळाली आहे असें उघड उघड ह्मणतात.

**चामुंड०**—खरें बाबा, तसा अनुभव तर येत चालला आहे.

**कन्हराय**—चामुंडराय त्या जयचंदाचा जात्यभिमान आणि देशाभिमान कसा नष्ट झाला! अरे कृतघ्ना, तुला पाहिजे होतें तर आमच्याशीं आणखी दोन हात तूं रणांत क-

रायचें होतेस, पण त्या यवनाला आपल्या घरांत जागा देऊन तूं आपला सर्वस्वीं नाश करून घेत आहेस, हें तुला कसें समजत नाहीं. आमच्या घरचे देखील निमकहराम लोक जर शत्रूला जाऊन मिळाले तर तुलाच एकट्याला दोष देऊन काय उपयोग ! त्या दुष्टाचें जर मीं त्याच वेळेस शीर उडविलें असतें, तर फार बरें झालें असतें.

**चामुंड**०–नष्टचर्य यायचें असलें म्हणजे, प्रत्येक गोष्टींत अपयश येऊं लागतें बुद्धि फिरते, मित्र ते शत्रू बनतात, ज्या ज्या गोष्टी होऊं नयेत त्या त्या हटकून होतात.

**कन्ह**०–मित्रा, माझा निश्चय झालेला तुला मीं कळविलाच आहे. आणि त्याशिवाय मला दुसरा मार्ग दिसत नाहीं. आतां एवढें खरें कीं, महाराजांचें लक्ष विलासांतून निघून इकडे लागल्यामुळें, बाईसाहेबांच्या आनंदक्रीडेंत अंतर पडून माझ्यावर त्यांचा राग होऊन, कदाचित् माझा शिरच्छेद देखील होईल. पण मला त्याचें बिलकूल वाईट वाटत नाहीं; कारण महाराजांच्या विमल कीर्तीला लागणारा डाग, आपल्या लोकांचा होणारा छल आणि पदरीं येणारें अपयशाचें माप, हें आतां माझ्यानें सहन होत नाहीं.

**चामुंड**०–खरें बोललास ! हजारों जणांच्या सुखापेक्षां आणि त्यांच्या जीवापेक्षां, एकट्याच्या सुखाचा पाड किती ! चंदपुंडीरानें खोट्या चाहाड्या महाराजांस सांगून सध्यां मला या स्थितीस पोंहोंचविलें आहे. व मीं आतां हातांत शस्त्र धरणार नाहीं ह्मणून प्रतिज्ञा केली आहे; तरी देखील त्या माझ्या स्वामीकरितां माझी प्रतिज्ञा मी खोटी करीन, आणि त्याच्याकरितां रणांत लढून मरेन; या बंदीखान्यांत कुजून मरण्यापेक्षां तेथें शत्रूला दोन हात दाखवून मेलों तर मला सद्गतीच मिळेल.

**कन्ह०**–या कामांत रामगुरुपुरोहितांनीं व दुसऱ्या मंडळींनीं असा अन्याय न करण्याविषयीं महाराजांस पुष्कळ सांगितलें, पण त्यावेळीं त्यांनीं कोणाचें देखील ऐकलें नाहीं. मागून महाराजांस पश्चात्ताप झाल्याशिवाय राहणार नाहीं.

**चामुंड०**–माझ्याबद्दल मला मुळींसुद्धां वाईट वाटत नाहीं, पण त्या चुगलखोरांच्या चहाड्यांनीं असा आणखी कोणावर प्रसंग न येवो म्हणजे झालें. मीं कसलांही अन्याय केला नाहीं, असें माझें मन जोंपर्यंत मला खात्री देत आहे, तोंपर्यंत या शिक्षेचें मला कांहीं वाईट वाटत नाहीं. ज्या वेळीं जी महाराजांची आज्ञा होईल ती शिरसा मान्य केलीच पाहिजे, बाबा दैवभोग कांहीं कोणाला सुटला आहे ?

**कन्ह०**–( डोळ्यांस पाणी आणून ) स्वतःवर प्रसंग गुदरल्यावर समाधानवृत्ति ठेवणें हें कांहीं सोपें काम नाहीं. तूंच खरा वीर. आकाश अभ्राच्छादित झाल्यामुळें मोठमोठे तारे जसे लोपून जातात त्याचप्रमाणें या सर्व वीरांची सध्यां स्थिती झाली आहे.

**चामुंड०**–मित्रा, माझ्याकरितां तूं वाईट वाटून देऊं नकोस ! अरे हें चाललेंच आहे. दिवस सरला म्हणजे रात्र येते, आणि रात्र संपली म्हणजे दिवस उगवलाच पाहिजे. तुला यश मिळावें आणि त्या नीचांची खोड मोडण्याचा प्रसंग यावा हीच माझी इच्छा आहे.

**कन्ह०**–बरें, उद्यां काय प्रकार होईल तो कळवीन !

**चामुंड०**–ठीक आहे.

(जातात.)

## प्रवेश ५ वा.

स्थळ–संयोगितेचा महाल.

पात्रें–( संयोगिता मंचकावर बसली आहे, आणि रूपावती तिच्या शेजारीं उभी आहे ).

**संयोगिता**–सखे, रूपावती ये बैस अशी ! नेहमीं अशी माझ्यापुढें हात जोडून उभी रहात जाऊं नकोस, असें मीं तुला कितिदां बरें सांगितलें, पण तुझें आपलें जें आहे तें आहेच. तुझी खरी हकिकत मला कळल्यामुळें माझी तुझ्यावरची प्रीति कमी होईल, हा तुझ्या मनांतला संशय अद्याप गेला नाहींच ना ! अग जें प्रीतितरूचें बीं तूं माझ्या हृदयांत पेरलें होतेंस, त्याचा सुदैवानें मोठा वृक्ष बनून, त्याचीं गोड गोड फळें मी सेवन करीत आहें, त्याच्या दाट छायेखालीं बसून आनंदाचा यथेच्छ उपभोग घेत आहें, त्या माझ्या सध्याच्या सर्व सौख्याला तूंच मुख्य कारण ! हें मी माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत कधींही विसरणार नाहीं; आणि ही संयोगिता तुझ्या उपकाराची कधींही उतराई होणार नाहीं.

**रूपा०**--बाईसाहेब, या आपल्या पायाच्या बटकीचे उपकार कसले ! मीं मनांत धरल्याप्रमाणें ईश्वरकृपेनें सर्व बेत शेवटास गेले आणि आपण सुखांत पडलां, हें पाहून मला मोठा आनंद होतो. मीं यांत कांहीं एक केलें नाहीं. उलट मी आपल्यास मोठी भाग्यवती समजतें कीं, आपल्यामुळें मला पुन्हां उभयतांच्या चरणांचा आश्रय मिळाला, नाहींतर माझी गति काय झाली असती कोणास माहित ! माझी खरी हकीकत कळून आपली माझ्यावर अवकृपा होईल अशी मला भीति होती, पण हे माझे उदार मनाचे धनिनी ती केव्हांच नाहींशी झाली. आप-

लें माझ्यावर पूर्वींप्रमाणेंच प्रेम आहे असें पाहून मी आपल्यास धन्य मानीत आहें. असें जरी आहे तरी मी मर्यादेची पायरी कशी ओलांडूं? या दासीची आपल्य. पायांजवळ उभें राहूनच सेवा करण्याची योग्यता आहे.

**संयो०**–कोण तूं दासी! छे दासी नव्हे, माझी सखी माझी जिवलग मैत्रिण, आणि तुझी योग्यता (तिला हात धरून जवळ बसविते) अशी माझ्या शेजारीं बसण्याची आहे, महाराजांसारख्यांना सुद्धां तूं आपल्या बुद्धिचातुर्यानें चकित करून टाकलेंस, तेव्हां तुझी योग्यता केवढी ह्मणून सांगूं. गडे पण तूं इतके दिवस पुरुषवेषानें महाराजांपाशीं कशीग राहिलीस! पुरुषवेष घेऊन त्यांच्यांत नेहमीं वागायचें, त्यांच्याप्रमाणें बोलायचें, त्यांच्याप्रमाणें चालायचें, मूळस्वभाव अगदीं बदलून आणलेल्या सोंगाची उत्तम बतावणी करायची, आणि ती देखील एक दोन दिवस नव्हे, तर तीन चार महिने सारखी अं! जबर बाई तुझी छाती! सखे तुला आतां तारा ह्मणूं, कीं रूपसिंग, कीं रूपावती ह्मणूं, ह्मणूं तरी काय!

**रूपावती**–(हांसून) ह्मणा काय वाटेल तें!

**संयो०**–पण हें सर्व तुला आलें कसें? ही युक्ति तुला सांगितली कोणी?

**रूपा०**–बाईसाहेब, कोणीं सांगायला लागत नाहीं. आणि सवरायला लागत नाहीं. प्रसंग पडला ह्मणजे सर्व गोष्टी आपोआपच येतात.

(इतक्यांत एक दासी येते.)

**दासी**–बाईसाहेब, सरकार स्वारी शिकारीहून वेशीजवळ आली असें आतां आलेला स्वार सांगत आहे.

**संयो०**–असें काय? बरें तुला सांगितल्याप्रमाणें सर्व तयारी करून ठेविली आहेस ना?

**दासी**–होय, बाईसाहेब, गुलाबपाण्यांत नानातऱ्हेचीं सुवासिक अत्तरें मिसळून त्यानें आपली पुष्करणी भरून ठेविली आहे. चंदनाच्या, अरगजाच्या, कस्तूरीच्या उट्या तयार करून ठेवल्या आहेत. पुष्करणीशेजारचा लतामंडप सर्व प्रकारच्या फुलांनीं सुशोभित करून ठेवला आहे; आणि महाराजांनीं स्वतां शिकार केलेला मृग मुदपाकखान्यांत पाठवून मी इकडे आपल्यास वर्दी देण्यास आलें.

**संयो०**–शाबास ! जा आणि जेवणाचीही तयारी लौकर कर.

( दासी जाते. )

मला जातांना सांगितलें होतें कीं, तीन चार दिवस लागतील ह्मणून; त्यावेळीं मीं किती हट्ट घेतला पण नाहींच ऐकणें झालें. सखे, मला किनई एक पळभर देखील महाराजांनीं दूर राहूं नयेसें वाटतें.

**रूपा०**–बाईसाहेब, प्रेमाची गोष्ट अशीच आहे.

( इतक्यांत पृथ्वीराज शिकारीचा पोषाख केलेला हातांत धनुष्यबाण घेऊन येतो. )

**पृथ्वी०**–प्रिये, ही रूपावती अगदीं खरें बोलली. दोन चार दिवस चांगली शिकार करावी, बाहेरची वनशोभा वगैरे पहावी, असा मीं मनांत पुष्कळ बेत केला होता, परंतु तो माझा बेत जागच्या जागींच राहिला. तुझें प्रेम मला मागेंच ओढूं लागलें, तेव्हां माझा अगदीं निरुपाय झाला.

**संयो०**–( जवळ जाऊन त्याचा पोषाख उतरूं लागते ) जसें कोणी म्हणेल खरेंच ! महाराज किती हे आपल्याला श्रम झाले आहेत. कशाला मेली हवी ती शिकार ! तिच्यावांचून असें काय अडलें आहे. ( वारा घालते. )

**पृथ्वी०**–सखे, परमेश्वरकृपेनें मला जो हा सौख्याचा अनुपम ठेवा सांपडला आहे, सध्यां जें सुख मी अनुभवीत आहें, त्यामुळें मला कोणतेही श्रम वाटत नाहींत. स्वर्गींचें सुख जास्त आहे असें जर कोणी म्हणत असले तर ते

खुशाल म्हणोत, मला तर तें मुलींसुद्धां खरें वाटत नाहीं. कदाचित् असलें तर मला तें मुळींच नको. या लोकीं राजैश्वर्य असून, स्वरूपसुंदर कामिनीच्या लुसलुशीत अधरामृतांत जी गोडी, तिच्या आलिंगनापासून जो आनंद तो स्वर्गांतील नंदनवनांत राहून नित्य अमृतपानापासून होणाऱ्या आनंदापेक्षां शतपटीनेंही जास्त आहे. तेथें आहे काय ? येथील सुखाची देव देखील इच्छा करतात. जयचंदा, जरी तूं माझ्याशीं वैर बांधिलें आहेस, जरी तूं माझा अपमान करून मोठा अपराध केला आहेस, तरी हें अप्रतिम सुंदर रत्न तुझ्या पोटीं जन्मास आल्यामुळें मला तूं प्रियच असून मित्रच वाटत आहेस. या रत्नाच्या लाभामुळें माझी धन्यता मी किती तरी वर्णन करूं !

**संयोगिता**—महाराज, माझी स्तुति किती करायची ! आपण माझा अंगीकार केलात, यामुळें मीच खरोखर धन्य आहें.

**पृथ्वीराज**—तुझ्या या अमर्याद प्रेमसमुद्रांत जें जें रत्न सांपडतें तें तें अमोलिकच. तेव्हां अशीं अनेक सुंदर रत्नें जितकीं सांपडतील तितकीं मिळविण्याची आणि त्यांच्या सौंदर्याची स्तुति करण्याची माझी हौस पुरी होते कुठें ! तो जसा अमर्याद तशी माझी इच्छाही अमर्याद. का रूपावती खरें कीं नाहीं.

**रूपा०**—तें खरें, पण चंद्रदर्शन झाल्याखेरीज त्या समुद्राला भरती येत नाहीं.

**पृथ्वी०**—तूं काय, कमी थोडीच आहेस ! आपापल्या पक्षाचा अभिमान प्रत्येकाला कसा असतो तो पहा.

**संयो०**—असें बोलत कितीवेळ उभें रहायचें; विश्रांति नाहीं का घ्यायची ?

**पृथ्वी०**—आज उन्हामुळें आपल्याला बराच त्रास झाला आहे,

तेव्हां माझ्या मनांतून आज तुझ्यासह जलक्रीडा करावी असें आहे.

**संयो०**–माझ्याही मनांत तेंच होतें, आणि त्याबद्दल मी विनंति करणार होतें, पण—

**पृथ्वी०**–पण कशाला, तुझी इच्छा तृप्त करणें याशिवाय या पृथ्वीराजाला जगांत दुसरें कर्तव्यच नाहीं. चल तर.

( सर्व जातात ).

---

## प्रवेश ६ वा.

**स्थळ**–दिल्ली शहरांतील राजवाड्याखालचा रस्ता.

**पात्रें**–( चंदबरदाई प्रवासी वेषानें येतो. )

**चंद०**–( आपल्याशीं दुःखित अंतःकरणानें ) विजयरायानें राज्यांतील अंदाधुंदीचा जो प्रकार सांगितला, त्याच्या दसपटीनें जास्त प्रकार माझ्या अनुभवास येत आहे. कन्हराय, रामगुरु पुरोहित, गिरधरराय, वगैरे मोठमोठ्या रणधुरंधरांची, मुत्सद्यांची, आणि सामंत सरदारांची जर चार चार सहा सहा महिने येथें दाद लागत नाहीं, त्यांना नुसतें राजदर्शन देखील होण्याची पंचाईत पडते, तर तेथें मजसारख्याच्या श्रमाचें सार्थक कसें होणार. ज्या चंदाला राजवाड्यांत कोणत्याही वेळीं कोठेंही प्रतिबंध नसे, जो चंद पृथ्वीराजाच्या शेजारीं मोठ्या डौलानें बसत असे, ज्याला सर्व लोक मोठ्या आदरानें मान देत असत, त्या चंदाला सध्यां कोणी ओळखीत नाहींसें झालें आहे. त्या चंदाला त्याच पूर्वीच्या दासीजनांकडून धक्काबुक्की खाण्याचा प्रसंग यावा अं: ! आज नाहीं तरी दहाबारा दिवस झाले, महाराजांना माझी चिठ्ठी पोंचावी ह्मणून मी

खटपट करीत होतों, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. ती सकवार बाई भेटली ह्मणून बरें झालें, नाहींतर आम्हाला आणखी किती दिवस रखडावें लागतें प्रभू जाणे! परमेश्वर तिचें कल्याण करो. माझी चिठ्ठी महाराजांस पोहोंचली असेल कां! पोहोंचून त्यांनीं विचार केला असेल कां! छे! इतके दैववान आह्मी कुठें आहोंत! त्या स्त्रीच्या पाशांतून जेव्हां ते मोकळे होतील तेव्हां साऱ्या गोष्टी! असो, अशी जरी स्थिती आहे तरी धैर्य सोडून न उपयोग नाहीं; आपल्या रोजच्या क्रमाप्रमाणें आपण आपली कामगिरी बजावावी. केव्हां तरी उपयोग होईलच होईल. ( वर पाहून आनंदानें ) अहाहा, आज माझा भाग्योदय झाला खास! हे पहा आमचे महाराज बारीमधें शोभा पहात उभे आहेत, तर येथून त्यांना ऐकूं जाईल असें मोठ्यानें ओरडावें. ( मोठ्यानें ओरडतो. )

## दोहरा.

**तुम इत नारिं बिहारमे, हो सक्त नर नाह ॥**
**चाढि आयो तुम नगरमे, उतसो गोरी शाह ॥ १ ॥**

**पृथ्वीराज,**–( पुन्हा पूर्वीचा दोहरा ह्मणतो ) राजा सावध हो, सावध हो.

( इतक्यांत दोन तीन दासी येतात. )

**पहि० दासी**–आतां ज्यानें दोहरा ह्मटला तो हाच मनुष्य! कायरे ए वेड्या तूंच ना मोठ्यानें ओरडलास? सरकारस्वारी येथें आहे हें तुला माहित नव्हतें वाटतें तुला ओरडायचें होतें तर बाजारांत जाऊन कां नाहीं ओरडत बसलास! अं:!

**चंद०**--सरकारी स्वारी येथें आहे ह्मणूनच तर मी ओरडलों. बाजारांत ओरडून मला काय करायचें आहे.

**दु० दा०**–धरा याला, चला घेऊन! ( त्याला धक्काबुक्की करतात)

**चंद०**—दासींनों, मीं तुमचा कोणत्याही प्रकारचा अपराध केला नाहीं. तुह्मी माझ्या अंगाला स्पर्श करूं नका. तुह्मी मला कोठें घेऊन चलणार?

**ति० दा०**—तुला आह्मी महाराजापुढें आणि संयोगिताबाई साहेबांपुढें घेऊन चलणार.

**चंद०**—वाः मग तर मी मोठ्या आनंदानें येतों. जें मला पाहिजे होतें तें थोड्याशा श्रमानें मिळालें हें माझें केवढें भाग्य!

**दासी**—पाठीवर चांगले चाबूक बसले म्हणजे समजेल तुला तुझें भाग्य केवढें मोठें आहे तें; चल हो पुढें.

**चंद०**—या निमित्तानें तरी कां होईना, माझी आणि माझ्या मित्राची भेट होणार ही काय लहान पर्वणी! चल चल लवकर.

(दासी चंदास घेऊन जातात.)

---

## प्रवेश ७ वा.

**स्थळ**—राजवाड्यांतील संयोगितेचा महाल.

**पात्रें**—(मंचकावर पृथ्वीराजा हातांत चिठ्ठी घेऊन विचार करीत बसला आहे.)

**पृथ्वीराज**—(आपल्याशीं खिन्न मुद्रेनें) "तूं पर गोरी रत्तियं, अरु ता घर गोरी तक्कियं ॥" ह्मणजे काय? याचा मला कांहींच अर्थ कळत नाहीं. गोरी कशाला येथें येईल! तो अद्याप मागली आठवण विसरला नसेल. कांहीं तरी लिहिलें आहे झालें! अं! (पत्र खालीं टाकून देतो व स्वस्थ बसतो.) हा काय ह्मणतो, "तूं पर गोरी रत्तियं—रत्तियं—(पत्र पुन्हां उचलून घेतो). पुढलें काय "अरु ता घर गोरी तक्कियं"

(इतक्यांत संयोगिता शृंगारवेषानें येते.)

**संयो०**–( त्याच्याजवळ जाऊन त्याच्या हातांतील चिट्ठी हिसकावून घेते. ) वल्लभा, त्यांत आपलें चित्त इतकें गढून गेलें आहे, असें काय आहे तें. कसली ही चिट्ठी ! ( हिसकावून घेऊन वाचते ).

**पृथ्वी०**–आण, आण इकडे ती चिट्ठी !

**संयो०**–छे: छे: ती आपण वाचूं नये. कोणी तरी चांडाळानें आपल्या उभयतांच्या प्रेमांत आणि विलासांत अंतर पाडण्याकरितां हें दुष्ट कृत्य केलें आहे. आह्मी रतिसुखांत असलेले ज्याला सहन होत नाहीं, असा कामदेवाचा शत्रु नीच कोण आहे हें जर समजेल तर त्याचा लागलाच शिरच्छेद करीन.

**पृथ्वी०**–" तूं पर गोरी रत्तियं " किती तरी गोड आहे हा चरण.

**संयो०**–प्रियकराची अशी एकदम भ्रमिष्टासारखी स्थिति कशानें झाली ? कांहीं तरी जादू भरली आहे या चिट्ठींत ! ( रागानें ) कोणी तरी चांडाळानें घात केला आणि प्रियाचें मन बहकविलें. खालीं जो मनुष्य मोठ्यानें ओरडत होता त्याच ढोंग्याचें तर हें कृत्य नसेल? पण माझा इतका बंदोबस्त असतां ही चिठ्ठी महाराजांच्या हातीं गेली कशी ?

( इतक्यांत दासी चंदाला घेऊन येतात ).

**दासी**–बाईसाहेब ज्यानें खालून मोठ्यानें ओरडून सवाल केला तोच हा मनुष्य.

**पृथ्वी०**–तूं सावध हो सावध हो म्हणून कोणालारे म्हणत होतास.

**चंद०**–कोणाला म्हणजे दिल्लीपतीला; आणि अद्यापि देखील ह्मणतों कीं, राजा—

## दोहरा.

तुम इत नारि बिहारमे, हो सक्त नर नाह ॥
चढि आयो तुम नगरमे, उतसो गोरी शाह ॥१॥

एवढ्याकरितां आणि त्याची दुष्कीर्ति होऊं नये ह्मणून.

**संयो**०-( रागानें ) अरे चांडाळा, घातक्या, दासींनों याला तिकडे घेऊन जाऊन छडीनें खूप झोडा आणि शहराबाहेर घालवून द्या.

**चंद**०-खबरदार, कोणी माझ्या अंगाला हात लावील तर. राजा मला ओळखलें नाहींस वाटतें. कशाला ओळखशील. जो विषयांध झाला त्याला आपल्या कुलाची, शीलाची, आपल्या कीर्तीची, फार तर काय पण आपली स्वतःची देखील ओळख रहात नाहीं, मग दुसऱ्याची कोठून राहणार.

**पृथ्वी**०-( आश्चर्यानें चकित होऊत ) कोण माझा मित्र चंद काय ?

**संयो**०-बाबानीं ज्याला कैदेंत ठेविलें होतें तोच हा भाट चंद !

**चंद**०-होय, पृथ्वीराजा, तोच हा अभागी चंदबरदाई !

**पृथ्वी**०-मित्रा ये ये, तुझी अशी दशा कशानें झाली, तुला असें कोणतें दुःख आहे ?

**चंद**०-महाराज, आपल्या विषयांधपणानें आपला प्रतापचंद्र अस्तास जात चालला आहे याचें मला अत्यंत दुःख होतें. ज्या आपल्या विक्रमरवीनें एक वेळीं सर्व भरतखंडांतील वीरांचे नेत्र दिपविले होते, तो आतां केवळ नामशेष मात्र राहिला आहे. दिल्लीपते, आपलें शौर्य, आपलें औदार्य, आपलें प्रजावात्सल्य वगैरे सर्व गुण सध्यां कोणीकडे गेले ? आज सहा महिने नानातऱ्हेच्या विलाससुखांत निमग्न होऊन या महालाच्या बाहेर काय चाललें आहे तें पहावें ह्मणून आपल्या मनांत कधीं नुसती कल्पना तरी आली काय! नाहीं, नाहीं. दुर्धर विषयेच्छा विवशीनें आपल्याला पुरें ग्रासून

टाकल्यावर ती दुसरें तिसरें सुचूं देते कशाला. महाराज अजून तरी सावध व्हा आणि आपल्या कर्तव्याला जागा.

**पृथ्वी०**—मी तर चांगला सावध आहें.

**चंद०**—बाहेर दिसण्यांत मात्र आपण सावध आहांत. परंतु राज्याच्या कर्तव्याविषयीं आपल्याला अंतर्यामीं अगदीं गाढ झोंप लागली आहे! दुर्दैव. या पौरजनांचें दुर्दैवच ओढवलें यांत बिलकूल शंका नाहीं. या संयोगिताबाईसाहेबांचा आणि आपला संयोग झाल्यापासून आपण विलासांत आणि नानातऱ्हेच्या क्रीडांत निमग्न झालांत आणि त्यामुळें राज्यकारभाराकडे आणि प्रजेच्या सुखाकडे आपलें दुर्लक्ष होऊन राज्यांत बंडें उपस्थित झालीं. नागरिक लोकांची आपल्या ठिकाणीं असलेली पूज्यबुद्धि नष्ट होत चालली. आपल्याला या विषयसुखापुढें दुसऱ्याच्या सुखदुःखाचें कांहींच कां वाटत नाहीं. ज्या आपल्या प्रजेच्या जिवावर आपण चैन मारतां तिची कशी दुर्दशा झाली आहे ती या स्त्रीमय सृष्टींतून निघून जरा बाहेर जाऊन पहा ह्मणजे समजेल. महाराज, आपल्या अतुल पराक्रमानें, शत्रूच्या हृदयांत भीति उत्पन्न करणारा, तो संजमराय वीर सध्यां कुठें आहे. हजारों वीरांमध्यें चमकणारा, शत्रूची फळी एकटा फोडून जाणारा आणि आपल्या युद्धकौशल्यानें सर्वांस थक्क करून सोडणारा तो निधड्या छातीचा शूर वीर गिरधरराय कुठें गेला. गिझनीच्या शाहानें आपल्या लेंकरांचा रक्तपात केल्यामुळें संतप्त झालेल्या आर्यभूमीस यवनांच्या रक्तानें स्नान घालून, त्यांच्या शिरकमलांची लाखोली वाहून तिला संतुष्ट करणारे, चंडपुंडीर, निरधरराय आतताई वगैरे रणयोद्धे सांप्रत कुठें आहेत. बरें, ज्या संयोगितेच्या नादांत आपण अगदीं लुब्ध होऊन गेलां आहांत त्या या संयोगितेच्या प्राप्तीकरितां ज्या कन्हरायानें वा-

कुलरायाशीं युद्ध करण्यांत अनेक संकटें सोशिलीं, ज्यानें जयचंदाशीं रणसंग्राम करून आपली प्रतिज्ञा शेवटास नेली, त्या विजयरायाची, त्या सामंत सरदाराची, आणि आपल्या सुखाकरितां रणयज्ञांत लक्षावधी मनुष्यें जीं बळी पडलीं त्यांची मागें स्थिति काय झाली, याविषयींचा विचार आपल्या मनाला कधीं तरी शिवला काय? संजमराय, आतताई, वगैरे वीर, ही पाठीमागली काळजी करण्याला आणि लोकांची दुर्दशा पहाण्याला राहिले नाहींत हें त्यांचें केवढें भाग्य! तो बिचारा चंडपुंडीर कारागृहांत आपल्या दैवदुर्विलासाचे दिवस कंठीत पडला आहे. तो विजयराय, आपल्या एकुलत्याएक कन्येसह फळांमुळांवर आपली दोनप्रहरची वेळ भागवून वानप्रस्थाश्रम स्वीकारून, आपल्या अब्रूकरितां डोंगराच्या गुहेंत राहून आपला आज्ञातवासाचा काळ लोटीत आहे. राज्यांत चोर, जार, वगैरे लोकांचा जुलूम असह्य झाल्यानें कित्येक नागरिक लोक परराज्यांत जाऊन आपला बचाव करून घेत आहेत. कित्येक नराधम शत्रूला जाऊन मिळाले आहेत. शत्रूंनीं आपल्या राज्यांतील प्रांत लुटून बहुतेक देश उध्वस्त करून टाकला. आपला विषयांधपणा जर आणखी कांहीं दिवस असाच चालला तर आपले शत्रू दिल्लीवर चालून येऊन आपलें सर्व राजैश्वर्य हिसकावून घेतील, व आपल्या प्राणावर संकट आणतील.

पृथ्वी०–काय मला शत्रू उत्पन्न झाले आहेत?

चंद०–महाराज, एकदोनच शत्रू उत्पन्न झाले आहेत असें नाहीं, तर आपल्याला सर्व बाजूंनीं शत्रु मंडळानें वेढून टाकलें आहे आणि रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून ते आपल्यावर घाला घालण्याची संधी पहात आहेत.

पृथ्वी०–ते कोण?

**चंद**०—एक आपला जुना वैरी महंमद घोरी. दुसरा विषयांधपणा, आणि तिसरा, जिला आपण आपल्या जीवनाला सदोदित पुष्टि देणारी केवळ अमृतवल्लीच ह्मणून समजतां त्याच संयोगिताबाईसाहेबांचा प्रयक्ष पिता जयचंद होय. हे दोन्ने कृष्णसर्प आपला केव्हां घात करतील याचा नेम लागणार नाहीं. महाराज ही अमृतवल्लि नव्हे, विषवल्लि होय, कारण विषारी झाडाला मधुर फळें कोठून येणार. जोंपर्यंत या विषयविषाचा अंमल आपल्यावर पूर्ण बसला नाहीं तोंपर्यंत सावध व्हा. विषयाची अमर्याद इच्छा हा नादीपणा, हे शृंगार, नानातऱ्हेचे विलास, आणि ही सुंदर स्त्री, तो घोरी आणि जयचंद आपल्या दरवाज्याशीं येऊन धडकल्यावर कांहीं देखील उपयोगीं पडणार नाहीं. शेंकडों वेळां शत्रूंचा पराभव करून, आपल्या शौर्यानें भरतखंड गाजवून जी आपली सुयशाची विमल पताका आजपर्यंत फडकत होती, तिच्यावर आतां मोठमोठे डाग दिसूं लागले आहेत. जी आपली राज्यलक्ष्मी स्वतांच्या तेजानें सर्व हिंदुजनांच्या नेत्रांस आनंद देत होती, ती आतां परशत्रू आल्यावर आपली गति कशी होईल या चिंताग्नीनें करपून जाऊन अगदीं निस्तेज झाली आहे. जे आपले प्रजाजन आजपर्यंत आनंदडोहांत पोहत होते, ते आतां शत्रू दिवसेंदिवस जास्त प्रबळ होत चालल्यामुळें, आपली पुढें स्थिति काय होईल, आपला हिंदुधर्म कसा राहील या दुःखांत बुडून गेले आहेत. ज्या घोरीला आपण लढाईंत सात वेळ धरून जिवंत सोडलें होतें, जो गर्विष्ट राजा जयचंद आपल्याकडे पहाण्यास देखील धजत नव्हता, ते आतां आपल्याशीं सामना करण्यास तयार झाले आहेत, व थोडक्याच दिवसांत दिल्लीवर चालून येणार आहेत. यावरून त्यांची शक्ति आणि आपली राज्यस्थिति आपल्याला

कळेल. राज्यांत अंदाधुंदी होण्याला, शत्रूला आमच्या घरांत शिरण्यास छिद्र सांपडण्याला, आणि आह्मी सनाथ असतां अनाथासारखे रानोरानीं हिंडण्याला, मुख्य कारण आपला कामांधपणा, आणि या आपल्या संयोगिताबाईसाहेब !

**संयोगि०**–( रागानें ) महाराज, हा आपला जिवलग स्नेही असला ह्मणून या भाटानें आपल्या समोर अशी वटवट करणें चांगलें वाटतें? आपल्या येथील यःकश्चित् वाचाळपंचीशी करून पोट भरणाऱ्या मनुष्यानें अशी आपली अमर्यादा करावी? आपले स्नेही ह्मणूनच मी गप्प बसलें; नाहीं तर–

**चंद०**–( संतापानें लाल होऊन ) संयोगिते, हा भाट राजाच्या पुढें हांजी हांजी करून आणि नुसती कवित्वें गाऊन आपलें पोट भरणारा नव्हे. जो कोणी पृथ्वीराजाचें यश मळविण्यास तयार होईल त्याचें शिर उडविणारा, याच्या एका केसाला धक्का लागला किंवा, याच्या रक्ताचा एक थेंब पडला तर तेवढ्याकरितां आपले प्राण त्याच ठिकाणीं खर्ची घालणारा, आणि चव्हाण वंशाचा यशोदुंदुभी दुमदुमविणारा हा चंदबरदाई होय. तुझ्या भयंकर प्रेमपाशांत हा पक्का फसला, रतिसौख्य सेवन करून त्या मदानें अगदीं अंधळा झाला आणि आतां पदच्युत होऊन सर्व चव्हाणवंश आणि हें राज्य पार बुडविणार, इतकी जेव्हां निकरावर गोष्ट आली, तेव्हां मीं हें साहस केलें. राजाला खरी स्थिति सांगितल्यानें तो शुद्धीवर येऊन जर सर्व लोकांचा ताप दूर होत आहे, आणि त्याचें श्रेय मला देहान्त शासन भोगून मिळत आहे तर मी तें सोसण्यास याक्षणींच तयार आहें. माझ्या एकट्याच्या प्राणापेक्षां लक्षावधी लोकांच्या जीविताची, दिल्लीच्या राज्याची, आणि

आजपर्यंत चव्हाणवंशांतील वीरांनीं मिळविलेल्या कीर्तीची किंमत फार फार अधिक आहे. देवादिकांच्या स्वर्गांतील सुखाला तुच्छ करणारीं अपार सौख्यें अनंत कालपर्यंत भोगूनः—

## दोहरा.

ऐ धरती कु लेयके मरे न जाते कोय ।
अंतकाल नरक ही मिले जुगमे अपजस होय ॥

सर्व देश परशत्रूनें लुटून फस्त केला, हिंदूंचीं देवालयें भ्रष्ट करून मूर्ती फोडल्या, लोकांचें सर्व वित्त हरण करून त्यांच्या माना चराचर कापून रक्ताच्या नद्या वाहविल्या, अरे फार तर काय, पण तुमच्या, डोळ्यांदेखत तुमच्या स्त्रिया धरून नेऊन दासी ह्मणून विकल्या; इतक्या गोष्टी या दिल्ली शहरांत घडण्याची वेळ येऊन ठेपली. तर हे चव्हाण वीरा, शुद्धीवर ये आणि तुझ्या दाराशीं येऊन थडकलेल्या शत्रूला आपला पराक्रम दाखीव; आणि निस्तेज झालेल्या आणि तुझ्या पराक्रमशून्यत्त्वाबद्दल अश्रू गाळणाऱ्या तुझ्या राजश्रीचे आणि सत्कीर्तीदेवीचे अश्रू पुसून तो गोरी त्यांना ओढून घेऊन जात आहे, त्याच्यापासून परत आण. जर तूं त्यांच्या सुटकेकरितां आणि धर्मरक्षणाकरितां रणांत पडलास तर——

## दोहरा.

राजा घर जात जुं मरे करे सुरग का भोग ॥
दुनियामे जस विस्तरे, हसे न दुरिजन लोग ॥

अशी गोष्ट असून रतिसौख्यांत निमग्न राहण्यांतच जन्माची सार्थकता असेल आणि हा विषयांध राजा शुद्धीवर येणार नाहीं, आणि आपल्या वैभवाची, आपल्या प्राणाची, आपल्या निष्कलंक कीर्तीची, आपल्या राष्ट्राची, आणि आपल्या धर्माची, कधींही शांत न होणाऱ्या विषयाग्नी-

च्या प्रचंड ज्वालेंत आहुति देऊन त्यांची राखरांगोळी करण्यास तयार झाला असेल, आणि तुलाही जर चव्हाण वंशाच्या यशाचा विध्वंस करणारी मूर्तिमंत ज्वाला आणि हिंदु धर्माची वियोगता असें ह्मणवून घेणें असेल तर राज्याची पुढें होणारी दैन्यावस्था हिंदुधर्माचा होणारा उच्छेद, तुमच्या कामांधपणामुळें भरत खंडाच्या पायांत पडणारी परवशतेची जबर शृंखला वगैरे गोष्टींपासून होणारें दुःसह दुःख प्रत्यक्ष अनुभवण्याची माझ्या नशिबीं पाळी येऊं नये ह्मणून या अभाग्या चंदाचें शिर या तरवारीनें (तरवार उपसून पुढें मान करतो ) आतांच उडवून टाक, ह्मणजे माझ्या अंतर्यामीं झालेला दुःखाग्नीचा भडका आणि तुझ्या ह्रदयांत अपमान झाल्यामुळें होणारी आग तरी शांत होईल! चल उडव शिर, उशीर लावूं नकोस. मरणाला भिणारा मी नव्हें. आज नाहीं उद्यां केव्हां तरी मरावयाचेंच आहे. ( पृथ्वीराज पुढें होऊन त्याच्या हातची तरवार घेतो. )

**पृथ्वी०**–( त्याला आलिंगन देऊन ) मित्रा चंदा, आतां माझ्या ह्रदयांत चांगला प्रकाश पडला; माझे डोळे तूं वेळींच उघडलेस; मला महत्संकटापासून बचावलेस. खरोखर मी महामूर्ख, या विषयानें अगदीं अंधळा होऊन गेलों होतों, पण माझ्या मंत्रीजनांनीं या गोष्टी मला कशा कळविल्या नाहींत.

**चंद०**–महाराज, सहा सहा आठ आठ महिन्यांत आपलें कोणाला दर्शन सुद्धां झालें नाहीं. मग भेट होऊन राज्यांतील वर्तमान कळविण्याचें तर लांबच. कोणताही निरोप या स्त्रीराज्यांतून आपल्यापर्यंत येऊन पोहोंचेल तेव्हां सर्व गोष्टी; तो तर बाईसाहेबांच्या देवडीवरूनच परत येतो. जो भीष्माप्राणें शूर योद्धा आपला प्रियसखा प्रत्यक्ष मेहुणा समरसिंह रावळ, आपल्यावर परचक्र येत

आहे ? ह्मणून सैन्यासह साह्यास येथें धांवून आला; त्याबद्दलची वार्ता तरी आपल्या कानीं आली काय ?

**पृथ्वी०**—काय म्हणतोस माझा मित्र रावळ येथें आला आहे ? केव्हां ! मला तर कांहींच माहित नाहीं.

**चंद०**—केव्हां ह्मणजे, त्यांना येथें येऊन दहा दिवस झाले. यापेक्षां आणखी आपल्या येथील अंदाधुंदीची सीमा ती कोणती राहिली ? त्यांच्यासारख्याची ही स्थिति मग, मजसारख्या पोटभरू आणि जयचंदाच्या कारागृहांत कुजत पडलेल्या या गरीब भाटाची महाराजांस स्मृति कशी होणार ?

**पृथ्वी०**—( दुःखानें ) अरेरे, किती मी कामांध ! केवढी माझी ही चूक ! रावळसारखा मित्र माझ्या येथें चालून आला असतां त्याची मीं वास्तपुस्तही करूं नये हा केवढा माझा प्रमाद ! तो वीर मनांत मला काय ह्मणत असेल ! माझी प्रिय भगिनी मला काय ह्मणेल ! ज्या माझ्या प्रिय प्रजाजनांनीं माझ्याकरितां आपल्या सर्व सौख्यांवर पाणी घातलें, त्यांना मीं इतकें विसरावें, हा केवढा माझा कृतघ्नपणा ! मदांधा पृथ्वीराजा, यामुळें केवढी तूं आपली अपकीर्ति करून घेतलीस. धिक्, धिक् या विषयछंदाला, या नादीपणाला आणि त्या ठिकाणीं रत होणाऱ्या आह्मा नरपशूंना !

**संयो०**—महाराज.—

**पृथ्वी०**—संयोगिते, मला आतां तुझा एक शब्दही ऐकणें नको.

**संयो०**—( मनाशीं ) आतांची वेळ पूर्वींची नाहीं. यावेळीं महाराजांच्याच मनाप्रमाणें बोलून त्यांचें शांतवन केलें पाहिजे. ( उघड ) महाराज, आपल्या घरीं रावळसारखे थोर पाहुणे आले, हा आजचा मोठा सुदिन समजायचा.

**पृथ्वी०**-या अभाग्याला तें काय होय ! चंदा, मी आतांच जाऊन त्यांची भेट घेईन, त्यांना वरीं आणीन आणि त्यांच्यापाशीं आणि माझ्या सर्व सरदारापाशीं माझ्या अपराधाबद्दल निष्कपटपणानें क्षमा मागेन तेव्हां मी स्वस्थ होईन. तूं कन्हराय चंदपुंडीर वगैरे सर्व सामंतांस सांगून दरबारची तयारी कर. प्रिये, आपल्या घरीं येणाऱ्या पाहुण्यांचा आदरसत्कार कसा करावा हें तुला सांगायला नकोच.

**संयो०**-मग या गोष्टीला उशीर लावूं नये ! महाराज आपण आतांच जाऊन त्यांना घेऊन यावें. मी इकडील सर्व व्यवस्था ठेवतें.

( दोघे जातात. )

**चंद०**-फार वेळ राखेंत पडलेला प्रखर अग्नि त्याच्यावरची राख झाडल्यावर, तो आपलें पूर्वींचें तेज दाखविल्याशिवाय राहत नाहीं. आतां मला असें ह्मणयला बिलकूल भय वाटत नाहीं, कीं—

## दोहरा.

**जयचंद गोरी थाःहसे, सो गजेन्द्र यदि होय ॥**
**पृथ्वीराज मृगेन्द्रके, सन्मुख टिके न कोय ॥ १ ॥**

( जातो. )

---

## प्रवेश ७ वा.

**स्थळ**-संयोगितेची एकांताची जागा.

**पात्रें**-(संयोगिता आणि रूपावती येतात. )

**संयोगि०**-रूपावती, कालचे त्या भाटाचे शब्द माझ्या हृदयाला विषाप्रमाणें झोंबतात. महाराजांचा आणि रावळचा ल-

ढाई करण्याचा बेत झाल्यापासून मला कांहीं एक सुचे-
नासें झालें आहे. कदाचित् बरें वाईट झाल्यास, " मागें
झालेला आणि आतां होणारा रक्तपात, आणि सर्व लो-
कांवर येणारीं संकटें यांला कारण ही कृत्या आणि हि-
चाच पायगुण " अशी माझी पुढें सर्व जगभर अपकीर्ति
होईल. या दुःखानें माझ्या हृदयाचें पाणी होत आहे.
काय करूंग, माझ्यामुळें, महाराजांस त्या भाटानें केलेली
निर्भर्त्सना सहन करावी लागली, माझ्यामुळें त्यांना सर्व
सर्व राजे आणि बाबा शत्रू झाले, माझ्यामुळें पुन्हां त्यां-
ना तरवार धरावी लागणार; अशीं किती तरी या चांडा-
ळणीकरितां त्यांना आणि असंख्य लोकांना दुःखें भो-
गावीं लागणार कोण जाणे !

**रूपा॰**–बाईसाहेब ज्या गोष्टी व्हायच्या त्या कधीं सुद्धां टळत नाहींत. आपण त्याबद्दल उगीच कां वाईट वाटून घेतां.

**संयो॰**–तें सर्व सरें, पण त्याचें खापर माझ्या माथीं फुटणार ह्मणून मला वाईट वाटतें दुसरें काय. गडे आतां मला एक उपाय दिसतो, त्याच्या योगानें हें माझ्या कपाळीं येणारें अपयश टळलें तर पहावें असें माझ्या मनांत आहे.

**रूपा॰**–कोणचा तो ?

**संयो॰**–तो कोणाला कळवून उपयोग नाहीं, अगदीं गुप्तपणें सर्व झालें पाहिजे.

**रूपा॰**–एकादी गुप्त गोष्ट माझ्या हृदयांत ठेविली कीं, तेथून ती बाहेर पडण्याची मुळींच भीति नको.

**संयो॰**–कन्हराय सेनापतीच्या काल असें सांगण्यांत आलें कीं, बाबांचा मुक्काम येथून आठ दहा कोसांवर आहे; आणि कागर नदीच्या पलिकडच्या जंगलांत गोरीचा तळ पडला आहे, त्या ठिकाणीं बाबा त्याला येऊन मिळणार आहेत. तेव्हां त्यांच्याकडे गुप्तपणें जाऊन त्यांचें मन वळवावें, आणि त्यांना महाराजांकडे सहायाला घेऊन यावें.

**रूपा०**–ते इकडे आले तर मग त्या गोरीची कथा काय ! त्याला मुख्य सहाय तर त्यांचेंच आहे. पण जयचंद महाराजांचा राग अतिशय कठिण आहे. एकदां जें त्यांच्या मनांत भरतें, तें मग कांहीं केल्या निघत नाहीं.

**संयो०**–तूं ह्मणतेस तसा बाबांचा स्वभाव आहे खरा, पण मीं त्यांच्यापुढें जाऊन हात जोडले असतां, त्यांची विनवणी केली असतां, मला जनापवादाचें किती दुःख होत आहे, हें सांगितलें असतां, त्यांच्या हृदयाला मुळींच कां पाझर फुटणार नाहीं ? जरी माझ्यावर त्यांचा आतां राग आहे, तरी माझ्यावरचें त्यांचें पूर्वीचें प्रेम त्यांच्या मनांत उभें नाहीं का राहणार ? माझी त्यांना दया नाहीं का येणार ? छे, छे, असें कधीं होणार नाहीं. त्यांचा स्वभाव रागीट आहे, पण त्यांचें मन फार कोंवळें आहे. तें माझें ह्मणणें खास ऐकतील.

**रूपा०**–आपल्या हेतूप्रमाणें सर्व गोष्टी झाल्या तर फारच चांगलें होईल.

**संयो०**–अग चांगलें ह्मणून किती सांगूं ! मी जनापवादापासून टळेन. बाबा दुष्कीर्तीपासून सुटून महाराजांचें आणि त्यांचें सख्य होईल. शत्रूची चांगली खोड मोडून आपल्या राज्यावर आणि हिंदुधर्मावर आलेलें वादळ नाहींसें होऊन सर्व जन आनंदांत राहतील.

**रूपा०**–आपण तिकडे जाणार कशा ? महाराज परवानगी कशी देतील?

**संयो०**–त्याविषयीं मीं सर्व तजवीज केली आहे. तुला मी जी कामगिरी सांगेन तेवढी तूं चांगली बजाव ह्मणजे झालें. चल आपण त्याच तयारीला लागूं. एकेक क्षण ह्मणजे सध्यां फार मोलाचा आहे.

**रूपा०**–चला, माझ्याकडून आतांच तयारी आहे.

**संयो०**–( जातां जातां ) हे कुलस्वामिनी, बाबांच्या मनांत दया उत्पन्न करून या कामांत मला यश येऊं दे. तसें जर तुझ्या मनांत नसेल तर एकाएकीं या संयोगितेवर विजेचा लोळ पाडून, किंवा हें मंदिर ढासळून हिचा एकदम अंत होऊं दे; म्हणजे हिच्यामुळें सर्वांना होणारा त्रास चुकून, ही लोकनिंदेला आणि तिरस्काराला पात्र होणार नाहीं. " विषारी झाडापासून गोड फळें कशीं उत्पन्न होणार, हा सर्व याच बाईचा पायगुण. आर्यधर्म बुडविणारी आणि हिंदुराज्याची मूर्तिमंत वियोगिता" हें सदोदित मनाला जांचणारे शब्द नेहमीं ऐकून घेऊन जिवंत राहण्यापेक्षां ही संयोगिता जगांतून नाहींशी झालेली पतकरेल, पण नको नको हें दूषण, आणि हे वाग्बाण सहन करणें नको.

जातात.

**अंक ४ था समाप्त.**



**टीप**—ह्या पुढील ५ व्या अंकांची पृष्ठसंख्या १ पासून निराळी चालण्यांत आली आहे.

# अंक ५ वा.

—:o*:o—

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—कागर नदीच्या कांठची अंबराई.

**पात्रें**—रूपावती किनरीवाल्णीच्या वेषानें येते.

**रूपावती**—( आपल्याशीं ) त्या मेल्या नोडग्यांच्या छावणींतून तर मी देवाच्या कृपेनें सुखरूप पार पडलें. काय त्यांचीं अघोर कारस्थानें ! आपलें काम झाल्यावर ज्या जयचंद महाराजांनीं त्याला सर्वस्वी सहाय केलें त्यांचाही मग कपटानें घात करण्याचा यांचा बेत. महाराज, अशा चांडाळाला पाठीशीं घालून आपण सर्वस्वी आपली हानी करून घेत आहां. जयचंद महाराज, याला येऊन केव्हां मिळणार, त्यांचा तळ सध्यां कोठें आहे, वगैरे गोष्टी आणि येथील सर्व प्रकार बाईसाहेबांस जाऊन सांगावा म्हणजे झालें. यांची तयारी फार मोठी दिसते. चहूंकडे फितूर करून ठेवल्यावर आणि या नराधम हाहुरीरायासारखे राज-द्रोही घरभेद त्याला मिळाल्यावर मग काय कमी ! अधमा, जन्मभर महाराजांचें अन्न खाऊन शेवटीं ही निमकहरामी केलीस ना. एखादा कट्टा दुस्मान पुरवतो, पण असला घरभेदा आणि केंसानें गळा कांपणारा अतिशय वाईट ! देव असलीं दुष्ट माणसें निर्माण तरी कशाला करतो. यांच्यावांचून

जग काय ओस पडतें. आतां त्या पलिकडल्या अंब्याच्या झाडाखालीं बसून थोडीशी विश्रांती घ्यावी आणि मग परतावें. ( इतक्यांत घोड्याच्या टापा ऐकूं येतात ) या घोड्याच्या टापा कोणीकडून बरें ऐकू येतात; कोणी माझा पाठलाग करीत तर येत नाहीं. ( इकडे तिकडे पाहून ) होय तो कोणी घोडेस्वार येत आहे. असेल कोणी तरी ! आपण आपला हा आडरस्ता धरावा, म्हणजे त्याच्या दृष्टीस पडायला नको आणि कांहीं नको.

( हाडुरीराय येतो. )

हाडुरी—( मनाशीं ) ती रूपावतीच खास ! जरी तिनें किनरीवालणीचा वेष घेतला होता, तरी मी तिला ओळखलें. आमच्या कडची बातमी काढण्यास तर ती अशा वेषानें आली नसेल ? नाहीं कोणी म्हणावें, सध्यांची वेळच तशी आहे. हे लेकाचे शिखानष्ट अगदीं महामूर्ख. दारूच्या धुंदींत वाटेल ते बडबडत सुटतात. ती जर या वेळीं माझ्या तडाक्यांत सांपडेल तर किती नामी होईल. ( लांबवर नजर करून ) तें त्या पलिकडल्या झाडांखालून लगबगीनें कोण बरें चाललें आहे. ( पुढें जाऊन पाहून, आतां तर संशयच नको. तीच ती. ( तिला दरडावतो ) कोन है तुम ! दुपेरके वख्त जो किनरी बजानेवाली आयीथी वो तुम है.

रूपावती—हां हुजूर !

हाडुरी—फिर इधर किदर चली.

रूपावती—पेट भरनेके वास्ते दुसरे जगे जाती हुं:

हाडुरी—अब तुमकु आपने पेटकी फिकिर नहि होना. गिझ-

नीकाशाह, तुजपर बडा आषक हो गया है, और वो तुजकु आपने लवंडीमे रखना चाहता है. तुजकु पिछे ले जानेके वास्ते उनने मुजकु भेजा. मे तेरे तलाष मे था ! जलदी मिली ऐ बहोत अछा हुवा. चलो हमारे सात छावणीमे !

**रूपावती**—जहापन्हा हुजकु आपनी लवंडी बनाना चाहते है ! हुजूर मेरी इतनी तगदीर कहां है. मुझे वो खायष नही होना. मे भीक मांगके खाउंगी वो मेरे एकले पेटके वास्ते बहोत है. ऐ घडी मे खुष हुवे तो इनाम देयंगे और दुसरे घडीमे खप्पा हुवे तो शिर कांटेंगे, इसवास्ते मे नहि आना चहांती हूं !

**शाहुरी**—शाहाके मुकुमके आगे किसीका चलेगा नही. तुजकु चलना पडेगा ! सिधे तऱ्हेसे चलेगी तो बहोत आछा, नहि तो बांधके ले जाउंगा !

**रूपावती**—गरिबपरवर, गरिबके उपर इतना जुलम कायके वास्ते होना !

**शाहुरी**—दुष्टे रूपावती आतां माझ्या पुढें तुझ्या गमजा, आणि तुझें ढोंग, किती वेळ चालणार. तुला मी केव्हांच ओळखिलें. तूं बोलून चालून वेश्या. तुला पृथ्वीराज काय आणि महंमद गोरी काय दोघे सारखेच ! चलतेसकीं नाहीं ?

**रूपावती**—( मनाशीं ) मेल्यानें ओळखलें ! मला माझ्या जिवाचें कांहीं वाटत नाहीं, पण बाईसाहेबाला इकडील सर्व बातमी कशी कळेल. माझ्या जाण्यावर त्यांचे पुढील सर्व बेत अवलंबून. वेळ येऊन बेतली खरी;

आतां डगमगून आणि याला भिऊन उपयोग नाहीं. शेवटपर्यंत धैर्य धरलें पाहिजे. ( उघड ) अरे नीचा, सगळें जग तुझ्यासारख्या अधमांनीं भरलें आहे असें तुला वाटतें का ? आजपर्यंत महाराजांचें अन्न खाऊन, त्यांच्या जिवावर ऐश्वर्य भोगून, शेवटीं त्यांच्याशीं हरामखोरी करून त्यांच्या शत्रूला जाऊन मिळालास ? अशा नीच कृत्यानें तूं मनुष्य जातीला आणि स्वभावाला मात्र लाज आणलीस. तुझ्यासारख्या निमकहरामापेक्षां तुकडा खाऊन पडलेलें कुत्रें किती चांगलें ! तें तरी प्रसंगीं आपल्या अन्नदात्याचे उपकार स्मरतें. तूं त्याच्याही पेक्षां नीच आणि अधमाहून अधम आहेस.

**हाहुरी**—दुष्टे, या सर्व गोष्टीला आणि माझी अशी दुर्दशा होण्याला तूंच मूळ कारण ?

**रूपा०**—मी नव्हे. हे सर्व तुझ्या दुष्टवासनेचें आणि पापाचें फळ !

**हाहुरी**—तें फळ मी भोगतों कीं तुला भोगायला लावतों हें लौकरच तुझ्या दृष्टीस पडेल. या ठिकाणीं माझ्या तडाक्यांतून तुला आतां कोण सोडवितो तें मी पहातों. कुठें आहेत ते आपले महाराज ! या कपट वेषानें येथील बातमी काढण्याकरितां आलीस का ? फार चांगलें केलेंस ! स्वर्गलोकीं गेल्यावर तेथें थोडीशी करमणूक असावी म्हणून तुला आधीं पाठविण्याची महाराजांनीं ही तजवीज केली. कारण तुझ्यासारखे नृत्यगायनांत कुशल, सुंदर, चतूर आणि चलाख असें आपलें प्रियपात्र मागें ठेवून कसें चालेल. चांडाळणी मी आतांच

येथें तुला ठार केली असती, पण त्यांत प्रौढी नाहीं, आणि तसें करून माझी तृप्ती होणार नाहीं. तुला परत घोरीकडे घेऊन जाऊन, तुझी फजीती करून, तुझा शिरच्छेद करवीन; तेव्हां माझा राग थोडासा शांत होईल. चल चालूं लाग.

( तिच्या अंगावर जातो. )

रूपा०—अरे घातक्या, हो मागें, खबरदार माझ्या अंगाला हात लावशील तर ?

हाहुरी—या तुझ्या दबकावण्याला कां मी भिणार ?

( तिला धरतो. )

रूपा०—घे तर !

( ती खंजीर त्याच्या उरांत खुपसते, तो जखमी होऊन पडतो. )

हाहुरी—( मोठ्यानें ओरडतो ) अरे मेलोंरे मेलों अग चांडाळणी—

रूपा०—मर–मर लवकर, मेलास तर फार उत्तम होईल. तुझ्या मरणानें जगांतील एक दुष्ट माणूस तरी कमी होईल. तुझ्या लहान पातकाबद्दल ही तुला योग्य शिक्षा झाली; मोठ्या पातकाबद्दल यमाच्या घरचे शेंकडों नरक तुझ्या करितां तयार आहेत. मोठमोठीं धनाढ्य कुलें जीं बुडतात, मोठमोठीं ऐश्वर्यसंपन्न राष्ट्रें जीं नष्ट होतात, पृथ्वीवर रक्ताचे प्रचंड प्रवाह जे वाहतात, ते सर्व तुमच्या सारख्या फितुरी घरभेदामुळें ? तुमच्या सारखी नीच माणसें जितकी लवकर जगांतून नाहींशी होतील तितकं चांगलं ! थुः तुझ्या जिण्यावर. ( मनाशीं ) आतां येथून लवकर आपल्याला मार्गाला लागलें पाहिजे. जास्त वेळ गमवीत जर मी येथें राहिलें तर आणखी संकटांत पडेन.

( त्याच्याकडे पाहून ) देवा ! या चांडाळाचा हा अपवित्र देह येथील पशूंच्या देखील भक्ष्यस्थानीं पडूं देऊं नकोस ! न जाणो त्यांचा स्वभाव पूर्वीपेक्षां देखील याच्यामुळें जास्त क्रूर होईल. तो येथें असाच कुजत पडूं दे. अधमा, आपल्या राजद्रोहाच्या पातकाचीं फळें येथें भोग आणि तेथेंही भोग !

( ती जाते. )

हाहुरी—अरेरे—जों मी त्या दुष्टेचा सूड उगविणार होतों ते एका बाजूला राहून शेवटीं तिनेंच आपला सूड उगवून घेतला.—पाणी—पाणी—आतां या प्रसंगीं माझी दाद कोण घेतो. अंतकाळच्याच वेदना या. आजपर्यंत मी इतक्या लढाया मारल्या, त्यापैकीं एखाद्या लढाईंत जरी यापूर्वीं माझा अंत झाला असतां तरी फार सर्वोत्कृष्ट झालें असतें. पण तें तसें होणार कोठून ! माझ्या माथीं हें राजद्रोहाचें पातक बसावयाचें होतें, तेव्हां रणांतील पुण्यकारक मृत्यू मला येईल कसा ! ज्यानें शेकडों-जणांचे गळे चराचर कांपले, ज्यानें कधीं रणांत माघार घेतली नाहीं, तो मी आज त्या यःकश्चित स्त्रीच्या हातून काळाच्या दाढेंत पडलों ! विश्वासघाताचें पातक फार भयंकर. तें आतां मूर्तिमंत काळस्वरूप बनून आपल्या आक्राळ विक्राळ भयंकर दाढा पसरून मला त्या खालीं चिरडून टाकण्यास माझ्या जवळ जवळ येत आहे. बा, मृत्त्यो, ये, लवकर ये आणि हा पातकी प्राणी लवकर घेऊन जा. रूपावती, तूं मजवर फार उपकार केलेस; नाहींतर आणखी माझ्या हातून भयंकर पातकें

घडली असती. ती माझ्या तोंडावर थुंकली. थुंको ! सर्व जगानें माझ्या तोंडावर थुंकावें असेंच मीं कृत्य केलें आहे, बा—काळा—आतां हा देह या जगांत फार वेळ राहण्यास उपयोगीं नाहीं—लवकर—आटप—राम—रा—म—विश्वासघात—राजद्रोह—नको—बेइमानपणा—फार भयंकर—राम—राम.

( मरतो. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—अंबराईतील जयचंदाचा तंबू.

**पात्रें**—जयचंद आणि कहरकंठीर बोलत बसले आहेत.

**जयचंद**—त्या षंढाला जिंकून माझा सूड उगविण्याला आतां उशीर किती. सर्व रजपूत राजांना मीं आपल्याकडे वळवून घेऊन घोरीलाही हाताखालीं घातला. माझ्या सैन्यापुढें आणि घोरीच्या जंगली लोकांपुढें त्याच्या मूठभर माणसांचें काय चालणार. रावळ खेरीजकरून त्या दुष्टाच्या मदतीला दुसरा कोण येतो ! त्याचा हाडवैरी जो महंमद घोरी त्याच्याकडून रणांत त्याचें उरस्थळ फोडून, त्याच्या रक्तानें मी आपले हात भिजवीन तेव्हांच माझ्या अंतःकरणांत पेटलेला द्वेषाग्नी शांत होईल. मला जर मग मरण आलें तर तें मी मोठ्या आनंदानें पतकरीन.

**कहर**—त्यानें केलेल्या महाराजांच्या मानहानी बद्दल त्याला असेंच शासन पाहिजे.

**जयचंद**—कहर कंठीर, काल आज कोण कोण राजे आपल्या सैन्याला येऊन मिळाले ?

**कहर**—पाटणचा भगवानसिंह, बुंदीचा कीरतसिंग, दुसरा जोतसिंह, आणि तेजराय वगैरे राजे आले आहेत व आज उद्यां इतक्यांत, भरतपुरवाले व रामपुरवाले येऊन मिळणार आहेत.

**जयचंद**—त्या सर्वांच्या गोटाची, दाणा, वैरण, वगैरेची व्यवस्था उत्तम ठेवा. बरें कनोज येथील जासूद आला कीं नाहीं ? दोन चार दिवसांत तिकडील कांहींच वर्तमान कळलें नाहीं. सुमती प्रधानास नवीन सैन्याची भरती करून तयार असावें, म्हणून पत्र लिहून आतां स्वाराबरोबर रवाना करा.

**कहर**—हुकूम महाराजांचा !

( इतक्यांत एक शिपाई येतो व तो कंठीराच्या हातीं पत्र देतो. )

**शिपाई**—सरकार बाहेर कोणी दिल्लीहून तरुण सरदार आले आहेत ते दिल्लीं येथील कांहीं गुप्त बातमी महाराजासच कळवायची आहे म्हणून म्हणतात. हुकूम होईल तर—

**जयचंद**—काय, दिल्ली येथील सरदार माझी भेट घ्यायला आले आहेत. पृथ्वीराजाच्या अंदाधुंदीला त्रासून जसें शेकडा लोक त्याला सोडून दुसरीकडे जाऊन राहिले तसेच हे असतील. या वेळीं त्याच्या कडील लोक जितके आमच्याकडे येतील तितके आम्हाला पाहिजेच. जा त्यांना आंत पाठवून दे.

**कहर**—( पत्र वाचून ) कायरे आतांच जासूद आला काय ?

**शिपाई**—नाहीं, आपल्या स्वारांपैकीं कांहीं स्वार जंगलांतून

परत येत असतां एका ओढ्याच्या कांठीं एक स्वार मरून पडलेला त्यांच्या दृष्टीस पडला. ते त्याची चौकशी करीत असतां, त्याच्याजवळ हें पत्र सांपडलें.

**जयचंद**—कहर कंठीर, सुमतीचें पत्र काय ? वाचा पाहूं !

**कहर**—होय सरकार. पत्र सरकारांनीं स्वतांच वाचावें. माझ्यानें तें वाचवत नाहीं.

**जयचंद**—असें काय त्यांत वर्तमान आहे.

( पत्र वाचून खालीं ठेवून रागानें आणि दुःखानें म्हणतो. )

झालें, आटोपला सर्व कारभार ! आतां या जगांत राहण्यांत कांहींच अर्थ नाहीं. त्या पोरीनें तसें कृत्य करून जें माझ्या तोंडाला काळें फासलें, त्यावर दुष्टेनें आत्महत्या करून घेऊन आणखी चांगलें दाट सारवण केलें. स्त्री, मुलें बाळें, आणि राजैश्वर्य असणें म्हणजे या जगांतील सौख्याची परमावधी असें सगळें जग म्हणतात, परंतु तें सर्व खोटें ! कारण या तिघांच्या योगानें माझें दुःख तर रोजच्या रोज दुणावत आहे. एखाद्या हलक्या कुळांत जन्मून, रोज कावाड कष्ट करून पोटाला मिळविणारा एखादा मजूर जर मी झालों असतों, तर किती आनंदांत माझा काळ गेला असतां. बाहेरून जनाला माझें ऐश्वर्य केवढें दिसत आहे आणि ते मला त्याच्या वरून केवढा सुखी आणि भाग्यशाली समजतात; परंतु माझी खरी अंतःस्थिती त्यांना काय माहीत ! माझ्या ऐश्वर्यतेजामुळें त्यांची दृष्टी दिपून जाते, म्हणून आंतील स्थिती समजण्याला ती शक्य होत नाहीं. जगाला बाहेरून जितका मी दैववान आणि सुखी दिसत

आहे, तितका मी दुर्दैवी आणि दुःखी आहे. हे अभाग्या जयचंदा, ही अपकीर्ति, हा अपमान आणि हें दुःख सोसण्यास तूं अद्याप कसा राहिलास ! हे यमदुतांनो, हा पातकी जयचंद तुम्हाला या वेळपर्यंत कसा दिसला नाहीं. हे सर्व जगाला भिवविणाऱ्या मृत्यो तुला देखील माझी भीति वाटूं लागली ! व सर्व प्राणीमात्राच्या ऐहिक सुखदुःखाचा विसर पाडणारें, आणि अनेक तापामुळें त्रस्त झालेल्यांचें केवळ विश्रांतीस्थान असें जें तुझें घर त्या ठिकाणीं या एका दुर्दैवी प्राण्याला लवकर घेऊन जा म्हणजे मी या सर्व विपत्तींतून तरी सुटेन ! तुला जर माझ्याकडे येण्याला भीति वाटत असेल तर हा पहा मीच तुझ्याकडे येतों. ( तरवार उपसतो. ) पण नको, या वेळेला जर मी आत्महत्या करून घेतली तर सर्व जग मला भित्रा आणि भ्रष्टप्रतिज्ञ म्हणेल; आणि मी जो आजपर्यंत एवढा व्यूह रचला त्याचा तरी मग काय उपयोग ? ( रागानें ) ज्या दुष्टानें माझ्या संयोगितेला भुरळ पाडून तिचें गुप्त रितीनें हरण केलें, मला जगांतून अगदीं उठविलें, त्या मदांध पृथ्वीराजाला त्याच्या दुष्कर्माचें प्रायश्चित देईन, आणि मग धारातीर्थी सुखानें देह ठेवीन. हाय, हाय, प्रिये पद्मिणी, पोरी संयोगिते, आपल्या सर्वांच्या दुःखाला खरोखर तोच नीच कारण.

( इतक्यांत सरदारवेशानें संयोगिता आणि रूपवती ) येतात संयोगिता जयचंदाच्या पायावर पडते.

कहर—( आश्चर्यानें ) अरे हें काय ? हा सरदार महाराजांच्या पायावर काय पडतो ? अरे ए—

**संयो**—( गहिंवरून ) बाबा--

**जय**—( चकित होऊन ) कोण संयोगिते तूं; आणि या वेषानें !

**संयो**—होय बाबा, तीच ही आपली लाडकी संयोगिता !

( त्याच्या गळा पडते. )

**जयचंद**—कुलटे, हो पलिकडे ! माझ्या अंगाला स्पर्श करूं नकोस ! ( तिला ढकलून देतो. )

**संयो**—तुमच्या मर्जीविरुद्ध वागलें हा मी तुमचा मोठा अपराध केला खरा, पण तुम्ही दिलेल्या दूषणाला मात्र मी खरोखर पात्र नाहीं. बाबा, हिचे सर्व अपराध क्षमा करा.

**जयचंद**—तुला नागिणीला मी लहानपणापासून वाढवून मी आपल्या नाशाला कारण करून घेतली, जन्मल्याबरोबरच नाहींशी करून टाकली असती तर मी आजच्या दुर्धर प्रसंगांतून बचावलों असतों. माझ्या राठोड सुवंश वृक्षाला दुष्ट, तूं आपल्या नीच कृतीनें अग्नि लाविलास. माझ्या जगद्विजयी स्वर्गस्थ सर्व वीर श्रेष्ठ पूर्वजांना नरकांत लोटून मला लज्जेनें जमिनींत तोंड खुपसण्याची पाळी आणलीस; आणि तुला जन्म देणाऱ्या त्या चांडाळणीनें आत्महत्या करून घेऊन तर सर्व नीच कृत्यांचा कळसच केला. तुमच्या सारख्या साहसी आणि कपटी स्त्रियांचा नुसता संसर्ग देखील घातक, मग जो मूर्ख सर्वस्वी तुमच्या अंकित होऊन राहतो त्याच्या पंचप्राणाची निःसंशय तेव्हांच लाही होऊन जात असेल !

**संयो**—( घाबरेपणानें ) काय ! आईनें आत्महत्या करून घेऊन हें जग सोडलें, आणि तें कां ?

**जय**—होय, त्या चांडाळणीनें आत्महत्या करून आपला दुष्ट अवतार संपविला. पहा हें पत्र ! ( पत्र तिच्या अंगावर फेंकतो. )

**संयो**—( पत्र वांचून धाडकन पडते, रूपावती तिला सावध करते ) आई—तुला बंदिवासाच्या दुर्धर यातना आणि बाबांचा रोजचा त्रास सहन न झाल्यामुळें तूं आपली अशा रितीनें त्यापासून सुटका करून घेतलीस अंः ! बाबा, तुमचे तें पूर्वीचें प्रेम एकदम नष्ट कसें झालें ! स्वयंवराचे दिवशीं तुम्ही जी आमची ताटातूट केलीत ती ही आतां नेहमींची झालीना ! असें करून तुम्हाला काय मिळालें. कपाळ करंटे संयोगिते, राज्यांतील सर्व लोकांस संकटांत पाडण्यास, आपल्या पित्याचा क्रोधाग्नि पेटविण्यास, आणि जिनें तुला जन्म दिलें, तुला तळहाताच्या फोडाप्रमाणें वागविलें, कनोजाधिपतीची पट्टराणी असून एखाद्या बंदिवानाप्रमाणें कारागृहांतील भयंकर यातना देखील जिनें तुझ्याकरितां सोशिल्या, त्या तुझ्या पूज्य मातेच्या आत्मघाताला शेवटीं तूंच कारण व्हावेस; त्यापेक्षां तूंच एकटी हें जग सोडून जातीस तर हा सर्व अनर्थ खचित टळला असतां. देवा, देवा, कोण मी दुर्दैवीः हवे ते कष्ट सोसून, नाना तऱ्हेचीं प्राणांत संकटें सोसून नऊ महिने पोटांत ओझें वागवून जिनें जतन केलें, त्या गोळ्यानें जन्मास आल्यानंतर तिचाच प्राणांत करावा हें किती चमत्कारिक ! ब्रम्हदेवाची करणी विपरित आणि कर्मांतील लेखन विचित्र म्हणतात तें असें. आतां मी हवी तितकी जरी आरडले, ओरडले तरी आई तूं

मला पुन्हा या जगांत कशाची भेटणार. आईच्या सुखाला आतां मी सर्वस्वी मुकलें. बाबा, तुम्ही तिला कैदेंत ठेवून जी इतकी छळलींत, तेव्हां त्या बिचारीनें तुमचा असा काय अपराध केला होता.

जय—जो अपराध तूं केलास त्याच तोडीचा तिचा अपराध ! एक प्रत्यक्ष कृत्य करणारी, आणि दुसरी त्याला उत्ते-जन देणारी. तुम्ही दोघींनीं सगळ्या जगभर माझा दुर्लौकिकाचा डंका वाजविला तरी तुम्हीं कांहींच केलें नाहीं अं: ? अगं राक्षसणींनो तुह्माला बंदिखान्यांत ठे-वलें म्हणून बरें झालें नाहीं तर तुम्ही आपले बेत सिद्धीस नेण्याकरितां माझा देखील खून करायला चुकला नसता.

संयो०—( दुःखानें ) बाबा, बाबा, हीं तुमच्याच तोंडचीं अक्षरें कां ! प्रलयकालच्या विजेचा भयंकर कडकडाट देखील यापेक्षां कमी असेल. त्या महासाध्वीला आतां मेल्यावर तरी असलीं दुर्भाषणें कां बोलतां ! बाबा, मला आतां तुमच्या शिवाय कोण आहे "बाळे संयो-गिते" असें प्रेमानें तुमच्याशिवाय कोण म्हणेल. आतां माझे बाप आंई दोन्ही तुह्मीच !

जयचंद—तुला माझी काय जरूर ! सर्व कांहीं गणगोत तुझा तो पृथ्वीराज आहेना ! जा त्याच्याकडे ?

संयो—त्यांनीं माझें मन चोरलें यांत त्यांच्याकडे काय दोष ? हा जर दोष असेल तर तो सर्व त्यांच्या गुणाकडे, रूपाकडे आणि त्यांच्या अप्रतीम शौर्याकडे !

**जयचंद**—जारिणी, या जयचंदापुढें त्याचें शौर्य कसें अप्रतीम आहे तें पाहीन आतां !

**संयो**—बाबा, असें वारंवार मर्मभदक शब्द बोलून माझ्या काळजाला घरें कां पाडता. ज्या गोष्टींत माझाच संबंध जास्त, ज्या गोष्टींत माझेंच हिताहित मीच जास्त चौकशीनें विचारीतें, आणि दूरदृष्टीनें पाहिलें पाहिजे, त्या या जन्माचा संबंध होणाऱ्या लग्नाच्या गोष्टींत मी थोडीशीं आपल्या मर्जीविरुद्ध वागलें तर त्याबद्दल तुम्ही रक्ताच्या नद्या वाहविण्याजोगा राग धरायचा ! माझ्या सर्व जन्माचें मातेरें झालेलें पाहून तुम्हाला आनंद वाटला असतांना ! त्यांतून महाराजांसारखे सर्वगुणसंपन्न महावीर कोणीकडे ? आणि आपल्या आश्रयानें वाढलेला तो परमार वंशांतील यःकश्चित सरदार कोणीकडे ? तुमच्या हेतूप्रमाणें जर झालें असतें तर माझा सर्व जन्म व्यर्थ जाऊन तुह्माला देखील जगानें नांवें ठेविलीं असतीं. मीं जें केलें तें आपल्या धर्माला उचित, असेंच केलें आहे. बाबा, गांधर्वविधीनें मी महाराजास वरून आपलें यश वाढविलें, त्याबद्दल जर आपली मजवर अखंड अप्रीति होत असेल तर प्रारब्ध माझें !

**जयचंद**—तुम्ही जसें आपापल्या धर्माप्रमाणें केलें तसें मलाही आतां ज्यानें जगासमोर माझी अशी मानखंडना केली, त्याबद्दल सूड उगविण्याचा माझा धर्म तो मला हातांत तरवार धरून केलाच पाहिजे, आणि तो मी समरांत करणार !

**संयो**—काय, बाबा, तुम्ही महाराजाबरोबर लढाई करणार !

**जय**—होय आणि त्याच्या रक्तांत मी ह्या तरवारीचें पात भिजवून द्वेषाग्नीनें संतप्त झालेल्या माझ्या मनाचें शांतवन करणार !

**संयो**—लढाईंत एकाला किंवा दोघांना जर दुर्दैवानें बरें वाईट झालें तर त्यामळें या आपल्या एकुलत्या एक लाडक्या संयोगितेची काय दशा होईल, याचा तुम्ही कांहींच कां विचार करीत नाहीं.

**जयचंद**—विचार काय करावयाचा आहे. सध्यां मला जें जग तुझ्या नीच कृत्यामुळें, आणि माझ्या अपमानामुळें नांवें ठेवित आहे तें मग ठेवणार नाहीं. मी समरांत पडलों तर त्यांत तुझें काय वाईट आहे. तुला मग दाही दिशा मोकळ्या आहेत.

**संयो**—शिव, शिव, बाबा असें म्हणूं नका. परमेश्वर तुम्हा उभयतांना पुष्कळ आयुष्य देवो, आणि तो उभयतांच्या मनांतील राग त्वकर घालवो. आपले वडिलांचे आणि माझ्या पूज्य आईचे चरण साक्ष ठेवून मी पुन्हा सांगतें कीं माइया हातून अयोग्य असें कृत्य मुळींच घडलें नाहीं. पण तें खरें कीं खोटें याचा जेव्हां तुम्ही शांतपणानें विचार कराल तेव्हां. बाबा, जरी महाराजावर आपला इतका राग आहे तरी त्यांची आपल्या ठिकाणीं अत्यंत पूज्य बुद्धि आहे.

**रूपा**—बाईसाहेब म्हणतात तें खरें आहे सरकार !

**कहरकंठीर**—( आश्चर्यानें )अरे, ही दुसरी कोण हें मी आतां ओळखलें ! ही ती दिल्लीची सोदी कर्नाटकी दासी. हिला बंदिखान्यांत ठेविली होती तरी तेथून पळाली. अगं

बटिके, बरी सांपडलीस आतां माझ्या तावडींत ? (उघड) म–म–महाराज, ही दुसरी कोण तिला आपण ओळखली कां ! हीच ती यांची लबाड कर्नाटकी दासी ! हिचेंच हें सारें कृत्य ! हिला आधी चांगली शिक्षा केली पाहिजे. हिनें माझा फार अपमान केला. माझ्याविषयीं यांच्या मनांत भलतेंसलतें भरविणारी आणि महाराजांची अवज्ञा करण्याला यांना शिकविणारी हीच यांची मुख्य शिक्षक. माझ्याविषयीं यांच्या मनांत पूर्वी खास प्रीति होती, आणि याबद्दलचे यांचे उद्गार मी प्रत्यक्ष आपल्या कानांनीं ऐकले आहेत. महाराजांची जी दुष्कीर्ति झाली ती सर्व हिच्यामुळें. काय–ग–एसटवे, बटिके, खरें कीं नाहीं.—बोल. नाहीं तर पहा तुला आतांच येथें चतुर्भुज करतों.

( तिला धरायाला जातो. )

**संयो०**—खबरदार तिच्या अंगाला हात लावलास तर ! तुमच्या सारख्या तोंडपुज्या आणि हलकट लोकांचें जेथें प्राबल्य होतें तेथें अनर्थ उत्पन्न व्हायचाच.

**रूपावती**—बाईसाहेबासारखें रत्न मिळण्याला अंगीं कांहीं तशीच योग्यता आणि जन्मांतरीची कांहीं पुण्याई लागते.

**कहर**—असें असें ! महाराज आपल्या समोर देखील ही बटीक माझा आणखी असा अपमान करते. बटिके—या कहरकंठीरवाशीं गांठ आहे. केव्हां तरी तुला एकदां माझा चांगला हात दाखवीन.

( मिशाला पीळ घालतो. )

**संयो**—बाबा, तुमचा आणि महाराजांचा पूर्वी किती स्नेह होता.

तुमचें उभयतांचें किती प्रेम होतें. तुम्ही जेव्हां दक्षिणेंत लढाईला गेला होता तेव्हां मागें याच गोरीनें हिंदुराज्य बुडविण्याच्या हेतूनें आपल्या कनोज शहरावर स्वारी केली, त्यावेळेस हिंदुधर्माचा अभिमान धरून, आपल्या मैत्रीला स्मरून, महाराजांनीं आपल्या देशाचें रक्षण केलें, आपल्या प्रजेला संकटापासून सोडविलें. ते उपकार आपण इतक्यांत कसे विसरलात. त्याची फेड तुम्ही अशा रीतीनें केलीत तर हें जग, तुमचें मन आणि प्रत्यक्ष कनोजचें नगरवासी लोक तरी आपल्याला काय म्हणतील हें कांहीं तरी मनांत येऊं द्या ! त्या उपकाराची तुमच्या हातून दुसऱ्या रीतीनें फेड होत नसेल तर राहूं द्या, पण सध्यां त्यांच्याशीं मांडलेलें वैर सोडून देऊन लढाई बंद करा म्हणजे सर्व आटोपलें. यावेळीं तुम्ही होऊन त्यांना सहाय्य करायचें तें सोडून तुम्ही परक्या शत्रूला आपल्या पाठीशीं घालून उलट कृतघ्नपणाचा दोष आपल्या पदरीं कां बरें बांधून घेतां. बाबा, मी एकटीच काय पण माझ्या सारख्या शेंकडों दासी तुम्ही त्यांना देऊन वर सर्व राज्य जरी आंदण दिलें तरी तें त्याबद्दल कमीच आहे. बाबा, सोडा तो राग आणि निष्ठुरपणा. तुमचें मन खरोखर इतकें कठोर नाहीं. मागल्या सर्व गोष्टी विसरून जर तुम्ही महाराजांना सन्मानानें घेऊन येऊन सहाय्य केलें तर काय होईल कीं दोन्ही बलिष्ट हिंदुराजांचें सख्य होईल; सर्व भरतखंडांतील लोकांवर आलेलें संकट आणि आपल्याच लोकांचा होणारा रक्तपात टळेल,

आणि त्या परक्या शत्रूची खोड मोडून सर्व जन आपली याबद्दल वाखाणणी करील.

जय—पण वालुकरायाच्या अकालीं आणि अपघातानें झालेल्या वधामुळें माझ्या हृदयाला पडलेली मोठी जखम कशी बुजेल. तुला आपल्या चुलत्याच्या वधाबद्दल आणि पित्याच्या दुष्कीर्तिबद्दल कांहींच दुःख वाटत नाहीं ! ज्यानें माझ्या प्रियबंधूंचा वध केला, माझ्या यज्ञाला विघ्न आणून माझा मनोभंग आणि मानभंग केला, जगांत माझी अपकीर्ति केली, त्या सर्व गोष्टी मी विसराव्या, त्याला सन्मानानें आणून सहाय करावें, अशा ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगण्याला, आणि आपल्या जाराच्या तर्फेनें माझ्याशीं शिष्टाई करायला आलीस, तेव्हां दुष्टे, तुझें हें केवढें धाडस, हा तुझा केवढा निर्लज्जपणा. या सर्व गोष्टी हा जयचंद जिवंत आहे तोंपर्यंत कधींही विसरणार नाहीं. याच्या हृदयांत त्या आणि त्या बद्दलचा सूड उगविणें हें सर्व वज्रलिपीप्रमाणें लिहिलेलें आहे.

कहर—महाराजांच्या रागापुढें आपली घडगत नाहीं असें आतां राजश्रींना वाटून, अशा रीतीनें समेट करण्याची यांच्याकडून शिफारस चालली आहे हें यावरून आतां उघड दिसतें. कां पराक्रमी पृथ्वीराज वीरमणी म्यायले वाटतें !

संयो—नीचा. तुझी इतकी फजिती झाली तरी तूं निर्लज्ज तो निर्लज्जच ! बाबांचा राग वाढविण्याला, उभयतांमध्यें वैर उत्पन्न करण्याला, आईच्या बंदिवासाला, सध्यां होणाऱ्या लढाईला आणि आमच्या कुलावर ओढव-

णाऱ्या अनर्थाला तूंच मूळ कारण ? तुझ्या सारख्या कलीपुरुषाच्या योगानेंच हा चहूंकडे कलहाग्नी पेटला आहे. तुझें पाऊल जर कनोज शहरांत पडलें नसतें, तर या थराला गोष्ट कधींही आली नसती. बाबांच्या आश्रयाला राहून चांगले उपकार फेडलेस ? सज्जनांचा द्वेष कसा करावा, पोकळ प्रौढी कशी मिरवावी, गरिबांचा छळ कसा करावा एवढें मात्र तुला समजतें. त्या परमार सारख्या उंच क्षत्रियकुलांत जन्मून त्याला मात्र दूषण लावलेंस ! तुझ्यासारखे कृतघ्न पुरुष त्या कुलांत आजपर्यंत खचित जन्मले नसतील. ( रागानें ) बाबा, महाराज म्यायले नाहींत आणि त्यांनीं मला शिष्टाई करायलाही पाठविलें नाहीं. आपलें दर्शन घेण्याकरितां, आपल्यापाशीं अपराधाची क्षमा मागण्याकरितां, आणि माझ्यामुळेंच हा होणारा अनर्थपात टळल्यास पहावा म्हणून मीच होऊन आपल्या चरणाजवळ विनंति करण्याकरितां आलें. जो दुष्ट यवन तुमच्यावर पूर्वी उठला होता, त्याच निखानष्टाला तुम्ही सहाय करून आणि आपसांत लढून, आपला सर्वतोपरी नाश करून घेऊन, हिंदु राष्ट्र बुडविण्याला, आणि आर्यधर्माचा छळ करण्याला, आणि यामुळें सर्व जगभर आपली अपकीर्ति करून घेण्याला कारण होऊं नका; एवढी मला भिक्षा घाला; आणि हेंच माझें आपल्यापाशीं पदर पसरून मागणें आहे. ( पदर पसरते ).

जय—जगांत माझी तूं दुष्कीर्ति करण्याची आतां बाकी कोणती ठेविली आहेस.

संयो—मी स्वयंवर केलें तुमच्या मर्जीप्रमाणें वागलें नाहीं, यामुळें जर तुम्हाला मी आपलें कुल सर्वस्वी बुडविलें असें वाटत असेल, तुमचा दुर्लौकिक केला असें तुमच्या मनांत पक्कें बिंबलें असेल तर तसें तें खुशाल बिंबो. पण तुम्ही हें पक्कें लक्ष्यांत ठेवा कीं, माझ्यामुळें झालेली तुमची दुष्कीर्ती माझ्या बरोबरच जगांतून नाहींशीं होईल, पण तुम्ही यवनाला सहाय झाल्यामुळें जर कदाचित् दुर्दैवानें हिंदूधर्माला, आणि हिंदूराष्ट्राला धक्का बसून सर्व भरतखंडवासी आर्य लोकांच्या माना परवशतेच्या दुर्धर फासांत अडकल्या आणि चहूंकडे यवनमय झालें, तर आपली दुष्कीर्ति चंद्र सूर्य आहेत तोंपर्यंत भयंकर रूपानें प्रत्येक हिंदूच्या डोळ्यापुढें मूर्तिमंत उभी राहून, त्यांच्या हृदयांत आपल्या स्थितीविषयीं दुःखाचा हलकल्लोळ उठविल्याशिवाय राहणार नाहीं; तो यवन तुमच्याच बलावर प्रबल झाला आहे, आपणहून आपली मान दुसऱ्याच्या हातीं कां देतां !

जय—दुष्टे, मला आतां या तुझ्या ब्रम्हज्ञानाच्या गोष्टी ऐकायला नकोत. एकाच जन्मांत चांगलें वाईट, सुख दुःख, राग, द्वेष, सूड जें काय म्हणून करून घ्यायचें असेल तें करून घ्यावें ! आपण मेल्यावर जग बुडालें. तुला मघाशीं सांगितलें आणि आतां आणखी एकदां सांगतों कीं, त्या चोरानें माझ्या बंधूंचा केलेला वध, तुझ्या आणि त्या नीच कृतीमुळें झालेली माझी मानहानी वगैरे गोष्टी जोंपर्यंत माझ्या दृष्टीपुढें मूर्तिमंत उभ्या आहेत तोंपर्यंत त्याचा कोणत्याही तऱ्हेनें सूड उगविण्याचा

झालेला माझा दृढ निश्चय कधींही ढळणार नाहीं, मग तो माझ्या हातून सिद्धिस जावो किंवा दुसऱ्याच्या हातून जावो ! समजलीस.

संयो—बाबा, इतके निष्ठूर नका होऊं. मी तुमच्या पायां पडते, तुमच्या पुढें पदर पसरून ही एवढी चुडेदानाची भिक्षा मागते ती घाला. नाहीं म्हणूं नका. आजपर्यंत तुमच्यापासून कोणताही याचक रिकामा परत गेला नाहीं असें असून तुमची कन्या संयोगिता तुमच्यापाशीं आर्यभूच्या सौभाग्यदानाची भिक्षा मागण्यास आली असतां तिला तशीच परत नका पाठवूं ! तुमचा पराक्रम सर्व भरतवासी जनांना माहित आहे. कांहीं तरी दया येऊं द्या.

जय—मला आतां दया माया कांहीं नाहीं. माझें हृदय काळ्या दगडापेक्षां देखील कठीण झालें आहे. त्या माझ्या हृदयाला तुझ्या या ढोंगी रडण्यानें, पाया पडण्यानें तुझ्या केविलवाण्यामुद्रेनें, अथवा तुझ्या दुसऱ्या कोणत्याही सोंगानें पाझर फुटणार नाहीं. हें हृदय आतां क्रोध, द्वेष, आणि सूड उगविण्याची प्रबल इच्छा, यांनीं अगदीं भरून टाकलें आहे.

संयो—( डोळ्यांत पाणी आणून ) बाबा, माझ्या करितांच जर तुमचा असा निश्चय असेल तर असो बापडा; पण मी एक शेवटींच गोष्ट सांगते तिचा तरी विचार करा आणि आपला निश्चय फिरवा. ही रूपावती गुप्त वेषानें नुकतीच त्या गोरीच्या छावणींत जाऊन तेथील सर्व प्रकार प्रत्यक्ष आपल्या डोळ्यानें पाहून आली. त्याला जाऊन मिळण्याच्या संकेताचें तुमचें पत्र हिच्या सम-

क्षच तेथें आलें होतें; आणि त्यामुळेंच आपल्या छावणीचा नक्की पत्ता आणि तुमच्या संकेताचा दिवस मला कळला. तुमच्याकडचें वर्तमान ऐकून त्याला मोठा आनंद झाला; आणि त्या आनंदाच्या भरांत तो असें म्हणाला कीं, आधीं तुमच्या मदतीनें दिल्लीवर स्वारी करायची, आणि मग कनोजकडे वळायचें. तुमच्या घाताविषयीं त्याचें कारस्थान आंतून चालू आहे. तो घातकी त्याचें काम झाल्यावर केव्हां तुमच्यावर घाला घालील हें समजणार नाहीं. म्हणून म्हणते कीं माझ्या करितां, कनोजच्या राज्याकरितां, निदान तुम्ही आपल्या प्राणाकरितां तरी त्याला मदत करूं नका.

**रूपावती**—बाईसाहेब सांगतात तें सर्व अक्षरशः खरें आहे सरकार !

**जयचंद**—( स्तब्ध बसतो. थोड्या वेळानें ) असें, असें ?

**संयो**—( जयचंदाच्या गळ्याला मिठी मारते ) होय, असेंच ! बाबा, करालना. असें ऐकालना एवढी माझी विनंती ! दोघांचें सख्य होऊन अनुपम सुख भोगण्याचा आनंदाचा दिवस मला येईल तर तो तुमच्याच आशिर्वादानें येईल. आपल्यासारख्या वीराच्या पोटीं जिनें जन्म घेतला तिच्या हातून भलतेंच अकार्य कसें होईल. हें पहा यामुळें सर्व हिंदू प्रजा स्वराज्याच्या छत्राखालीं आनंदांत राहील.

**जय**—( रागानें ) चल दूर हो, ( तिला लोटून देतो ) हें तूं आपल्या जाराला शासन होऊं नये, मी गोरीचा पक्ष धरूं नये, सूड उगवूं नये म्हणून कांहीं तरी कुभांड

रचलें आहेस. तुम्ही कृत्या स्त्रिया वाटेल तें साहस कराल; आणि त्यांतून खोटें बोलण्याची, कपट कृती आणि लाघवीपणा करण्याचें तर तुम्हाला बाळकडूच पाजलें आहे. तो माझ्याविषयीं असें कधीं सुद्धां मनांत आणणार नाहीं. कदाचित् त्यानें माझ्याशीं दगलबाजपणा केला तर मग तो येथून गिझनीला परत कसा जाईल तो मी पाहीन. पोरी, तूं माझ्या पोटीं आलींच नाहींस असें मी समजतों. मग मला तुझ्या सुखदुःखाची काय परवा आहे. कुलटे, तुझें नशिब तुझ्या बरोबर! येथून चालती हो, मला तुझें मुखावलोकन करणें नको.

**संयो**—( रागानें उठते ) एखाद्या दगडाची जर मी इतकी विनवणी केली असती तर तो देखील द्रवला असतां. बाबा, त्या यवनाचा तुम्हाला विश्वास वाटतो, आणि जी गोष्ट डोळ्यांनीं पाहिली आणि प्रत्यक्ष ऐकली ती तुम्हाला मी सांगितली म्हणून खोटी वाटावी अं:! सर्वांचें दुर्दैव ओढवलें हेंच खरें! तुमच्या या अविचाराच्या कृतीचें, आणि मनस्वी हट्टीपणाचें, फळ कोणा कोणाला कसें आणि किती दिवस भोगावें लागेल कोण जाणें? याचा अनुभव तुम्हाला लौकरच येईल! मग त्याचा मागून उपयोग काय? माझें हृदय माझ्या दुःखाकरितां जितकें फुटतें, त्याच्यापेक्षां जास्त तुमच्यावर आणि महाराजावर येणाऱ्या संकटाकरितां फुटतें; आणि कदाचित् लढाईचा परिणाम भलताच झाला तर या सर्व आर्यलोकांना परक्यांच्या ताब्यांत राहून दांतीं तृण धरावें लागेल, त्यांना गुलामाप्रमाणें वागावें लागेल,

त्यांचीं नाना तऱ्हेनें विटंबना होईल, आणि हें सर्व कनोजाधिपतीच्या कृतीचें फळ, अशी तुमची सर्व भरत-खंडभर दुष्कीर्ति होऊन या असह्य दुःखानें तर त्याचे शतशः तुकडे तुकडे होतात. काळ फिरला म्हणजे बुद्धि फिरते, आपलीं माणसें फिरतात, सर्व कांहीं अगदीं उलटें होतें. ज्या अर्थी हें रणकंदन माझ्यामुळें माजणार, हजारों वीरांच्या प्राणाहुति या रणयज्ञांत पडतात, भरतराष्ट्राच्या नाशास आणि आर्यबंधू भगिनींच्या दुःखास मी मूळ कारण होऊन, त्याचे सर्व अभिश्राप माझ्या माथीं येणार; त्या अर्थी या सर्वांना यवनांच्या त्रासापासून सोडविण्याकरितां, आणि त्यांचें रक्षणाकरितां ही संयोगितां वीरकन्येला, वीरपत्नीला आणि क्षत्रिय कुलांत उत्पन्न होणाऱ्या शूर रजपूत वीरभगिनींना भूषण होईल असें कृत्य करून तुमची महाराजांची आणि माझी कीर्ति अजरामर करून ठेवील. तरच त्या माझ्या प्रिय आणि पूज्य पद्मिणी मातेच्या पोटीं मी जन्म घेतल्याचें सार्थक ! रूपावती चल, बाबा, या कुलटेचें काळें तोंड या पुढें तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं आणि हिचें नांवही तुम्हाला ऐकूं येणार नाहीं.

( त्याला नमस्कार करून जातात. )

**जय०**—कहरकंठीर, हिनें सांगितलेली बातमी कदाचित् खरी असेल; करितां—

**कहर**—छे, महाराज, मला नाहीं तसें वाटत ! आपण त्यास सहाय्य होऊं नये, एवढ्यांकरितांच हें सर्व कारस्थान आहे अशी माझी पक्की खात्री झाली. महाराज, तो

आपल्याशीं विश्वासघात करील कसा ? त्याला आपली जिवाची व लोकांची कांहींच पर्वा वाटत नाहीं. छे हें सब झूट आहे.

जयचंद—कोणी सांगावें ? प्रत्यक्ष आपलीं घरचीं माणसें जर घात करायाला चुकत नाहींत, तर या यवनाबद्दल खात्री कोणी द्यावी. असें उपयोगी नाहीं. आपण कबूल केल्याप्रमाणें दहाहजार फौज त्याच्याकडे मदतीला पाठवून द्यावी, आणि लढाईची सुरुवात करायला सांगावें; आणि आपण येथेंच राहून जसा प्रसंग येईल तसें करावें. असें केल्यानें त्याला मदतही केल्यासारखें होऊन कदाचित् त्याच्या मनांत दगा करायचा आलें तर तसें करायास त्याला संधी सांपडूं नये; कां खरें कीं नाहीं ?

कहर—( मनाशीं ) या म्हाताऱ्याच्या बुद्धीला भुरळ पडत चालली बरें; आणि याच्या क्रोधाची ज्वालाही थोडीशी विझत चालल्या सारखी दिसते, तर तसें होऊन देऊन उपयोगी नाहीं, मला तीही नेहमीं पेटलेलीच ठेवली पाहिजे. त्याशिवाय या म्हाताऱ्याची त्यांत केव्हां तरी आहुती पडून कनोजची गादी मला मिळणार कशी ! याला आपल्या कबज्यांत धरून गोरीच्या सहायानें आपला डाव यांतच साधून घ्यावा. ( उघड ) फार चांगलें; सरकारांनीं युक्ति अगदीं सोळा आणे काढिली. बरें त्याच्याकडे सैन्यासह कोणच्या सरदाराची योजना करायची ! आज्ञा होत आसल्यास इकडील सर्व बंदोबस्त करून—मीच—कारण—अशा वेळीं भलत्यालाच पाठविल्यास मसलत फसायची !

**जयचंद**--तुमच्या पेक्षां जास्त विश्वासूक आमचा दुसरा कोण आहे. तुम्हीच जा. मात्र प्रसंग पडल्यास मला गुप्तपणें कळवा ह्मणजे झालें.

**कहर**—सरकारच्या गादीपेक्षां मला जास्त काय आहे. ( मनाशीं )संयोगिता हातची गेली ती गेलीच, शिवाय गादीही अशा वेळेला प्राप्त होणारी मी घालविली ह्मणजे मग माझ्यांत आणि पशूंत कांहीं भेद नाहीं असें सर्व जग ह्मणेल. ( उघड )पहाटेच कूच केला ह्मणजे आपल्या संकेताप्रमाणें जाऊन पोंहचेन.

**जय**—ठीक ! नीट सावधगिरीनें वागा.

**कहर**—महाराजांनीं आतां अगदीं बेफिकीर असावें. पृथ्वीराजाची खोड मोडन महाराजांस जेव्हां मी सुखी करीन तेव्हांच मला आनंद होईल.

( जातात. )

---

# प्रवेश ३ रा.

स्थळ—पृथ्वीराजाचा महाल.

**पात्रें**—पृथ्वीराज रूपावतीच्या मदतीनें मंचकावर बसून समरवेष करीत असतां पडदा उघडतो.

**पृथ्वीराज**—( आपल्याशीं ) छे, असल्या गोष्टी मुळीं मनांतच आणून उपयोग नाहीं. जों जों त्याविषयीं जास्त विचार करावा, तों तों या स्वप्नांतील गोष्टी निरुत्साह करण्याला आणि मनाला उदासीनता आणण्याला मात्र कारण होतात. या दुष्ट स्वप्नावर विश्वास ठेवून आपलें धैर्य खचूं देणें हें माझ्यासारख्या वीराला शोभत नाहीं मी

आपल्या भरतभूमीकरितां, आपल्या प्रजेकरितां आणि माझ्या पूर्वजांनीं मिळविलेल्या विमल कीर्तीकरितां जर लढण्यास तयार झालों आहे, आणि आपल्या क्षत्रिय धर्माप्रमाणें चालत आहे तर परमेश्वर मला कधींही अपयश देणार नाहीं. असें दुःस्वप्न मला पूर्वी कधींही पडलें नव्हतें. मला गाढ झोंप लागली असतां, स्वप्नांत माझ्या जवळ एक अत्यंत रूपवती स्त्री येऊन, हांसत हांसत तिनें माझा हात धरिला काय, आणि एकदम एका जंगलांतून भयंकर हत्ती येऊन त्यानें तिला आपल्या सोंडेनें धरून नेलें काय ? सर्वच चमत्कार ! त्यावेळची तिची ती हृदयाचें पाणी करणारी किंकाळी अद्याप माझ्या कानांत गुणगुणत आहे, आणि तिची ती दीनवाणी मुद्रा अजून माझ्या डोळ्यापुढें दिसत आहे. यांतील गूढ कांहीं मला समजत नाहीं, पण त्या वेळेपासून माझा उत्साह नाहींसा होऊन मला भीति वाटूं लागली. मी आपलें स्वप्न हिला सांगूं कां ! छे, नको. त्यामुळें तिच्या मनाला मात्र धक्का बसेल.

( इतक्यांत संयोगिता हातांत हार आणि कलगी घेऊन येते. )

**संयो**—वल्लभा, कसलीही आतां संकटाची वेळ येऊन ठेपली तरी त्यापासून या संयोगितेच्या मनाला बिलकूल मुद्धां धक्का बसणार नाहीं इतकें कठोर झालें आहे. माझ्या मनाला त्रास होईल म्हणून आपण मजपासून कांहींएक लपवूं नये. जर आपल्याला जाचणारें एखादें दुःख बाहेर न सांगतां मनांत ठेवलेंत, तर तें नेहमीं आपल्यापुढें उभें राहून आपला निरुत्साह करील, आणि त्यामुळें आपल्या

हातून कांहींच पराक्रम होणार नाहीं, म्हणून म्हणते कीं, आपण तें मला आवश्य सांगा.

**पृथ्वी**—सखे, असें मोठें भिण्यासारखे कांहीं नाहीं. जसें तुला स्वप्न पडलें तसेंच मलाही एक पडलें.

**संयो**—प्रियकर, आपला जयजयकार असो. दुष्ट स्वप्नें आपल्याला सुस्वप्नें होवोत, आणि आपल्या अंगीं वीरश्री, आणि शत्रूंना शासन करण्याचें सामर्थ्य परमेश्वर सदोदित ठेवो. महाराज, बाबांनीं जर माझें म्हणणें ऐकलें असतें तर या थराला गोष्ट येऊन पोहचली नसती— पण—माझ्या नशिबीं तें यश कुठलें.

**पृथ्वी**—( तिला जवळ घेऊन ) प्रिये, आतां त्याबद्दल दुःख करून काय उपयोग ! तरी मी तुला प्रथमपासून सांगत होतों कीं तूं त्याच्याकडे जाऊं नकोस म्हणून ? पण त्यावेळीं तूं माझें ऐकलें नाहींस.

**संयो**—बाबांचें मन इतकें बदललें असेल असें मला वाटलें नव्हतें. त्यांतून ही माया आणि मनाची ओढ ! त्यांनीं मला लाथेनें दूर लोटून दिलें, झिडकारलें, कानांनीं ऐकूं नयेत असे वाग्बाण मारले, त्याचें मला कांहीं वाईट वाटत नाहीं, पण त्या मेल्या कहरकंठीरासमोर आपल्याला आणि माझ्या आईला रागाच्या आवेशांत जीं त्यांनीं दूषणें दिलीं, तीं आठवलीं कीं माझ्या हृदयांत दुःखाचा लोळ उठतो. आई—( रडूं लागते )

**पृथ्वी**—असूं दे ! विसर तें सर्व ? या सर्वांचें उसने त्याच्याकडून मी रणांगणांत घेतल्याशिवाय राहणार नाहीं. जयचंदानें मला येऊन सहाय्य करावें असें मी म्हणत

नाहीं. पण त्यानें सर्व रजपूत राजे फितूर करून माझ्या शत्रूला मिळावें, आणि माझ्यावर स्वारी करावी हें मात्र अति दुःसह. त्याला पाहिजे असेल तर त्यानें माझ्याशीं प्रत्यक्ष दोन हात करावें; त्यांत आम्ही पडलों तर आम्हाला सद्गतीच मिळेल. पण सध्यांच्या याच्या या नीच कृत्यानें जर कालचक्र फिरलें, तर यःकश्चित् गोष्टी-साठीं दोघांनीं लढून यवनाला घरांत घातला आणि हिंदु-राष्ट्र बुडविलें; ही अपकीर्ति अखंड राहील याचें मला अत्यंत वाईट वाटतें. असो आतां काय त्याचें ! लढाईची सर्व व्यवस्था होऊन चुकली. फक्त केलेल्या व्यवस्थेसंबं-धानें तुझी मसलत काय आहे एवढें विचारणें बाकी आहे !

**संयो**—महाराज, या कामांत आम्हा बायकांना काय समजतें; आम्ही सल्ला ती काय देणार ! आम्ही स्त्रिया खरोखर दुष्ट आणि अनर्थ कर्त्या ! सीतेमुळें रामायण झालें ! द्रौपदीमुळें भारतीय युद्धप्रलय माजला ! बरें हा प्रसंग तरी आम्हां स्त्रियांमुळेंच आला ना !—

**पृथ्वी**—प्रिये संयोगिते, असें म्हणूं नकोस ! हा आजचा रण-प्रसंग तुझ्यामुळें होत आहे असें जे कोणी मूर्ख म्हणत असतील ते म्हणोत, मी तर असें कधीं म्हणणार नाहीं. ईश्वरानें मनुष्यप्राणी निर्माण केला मग तो स्त्री असो किंवा पुरुष असो त्याच्या अंगीं सद्गुण आणि दुर्गुण हे दोन्ही ठेवलेच आहेत. गैरसमजुतीनें, चुकीनें, किंवा अज्ञानपणानें दोघेही वेळीं चुकतात. रक्तमांसाची प्राण राहण्यास जितकी अवश्यकता तितकी या जगांत सुखानें आयुष्य घालविण्यास स्त्रीपुरुषांची एकमेकाला

जरूर आहे. एका वांचून दुसऱ्याचें कधींही चालणार नाहीं. फार काय सांगूं या अफाट जगदारण्यांत स्त्री हें एक अत्यंत सुंदर प्रेमजलानें नेहमीं भरलेलें असें सरोवर आहे, आणि पुरुष हे त्याठिकाणीं विहार करणारे राजहंस पक्षी होत. हें मानस सरोवर नसलें तर राजहंसाचा काय उपयोग ? आणि राजहंस नसले तर त्या सरोवराचीं शोभा पाहून आणि त्याच्या प्रेमोदकांत यथेच्छ क्रीडा करून संतुष्ट तरी कोण होणार. प्रत्येकाचा दुसऱ्या शिवाय या जगांतील अयुष्यक्रम एखाद्या भणभणीत; रुक्ष, आणि निर्जन वनांतील प्रवासाप्रमाणें होय. बहुतेक सर्व जग आमच्या सुखाचे वाटेकरी, दुःखाचा वाटेकरी आपलें आपण किंवा आपली स्त्री ! तेव्हां तुझ्याशिवाय माझ्या खऱ्या सल्लामसलतीचें दुसरें ठिकाण कोणचें. काल दुपारीं दरबार भरवून सर्वांच्या अनुमतानें माझें प्रिय मित्र जे समरसिंह रावळ त्यांना मुख्य सेनापती करून आपल्या कन्हराय चव्हाणास त्यांचे दुय्यम नेमिलें. चामुंडराय, चंदपुंडीर वगैरे मोठमोठ्या सरदारास सैन्याच्या निरनिराळ्या भागावर अधिकारी नेमून त्यांना त्यांच्या ताब्यांत राहण्यास सांगितलें. सर्व खजिना खुला करून फौजेचा राहिलेला पगार देऊन टाकून आणखी सर्वांना इनामें देऊन संतुष्ट केलें. ही केलेली व्यवस्था तुझ्या पसंतीस आलीना ! यांत कांहीं कमी ज्यास्त करण्याचें राहिलें असल्यास सांग ? तुला समजत नाहीं असें कोण म्हणेल ! जयचंदासारख्या पराक्रमी आणि दक्ष वीराची कन्या तूं !

**संयो**—प्रिया, या व्यवस्थेनें रावळला आपण मोठा मान दिल्या-सुळें ते संतुष्ट झाले. इनामें दिल्यानें आपली सर्व सेना आपल्यावर पूर्वीप्रमाणें प्रीति करूं लागेल, आणि रणांत आपल्या प्राणांकडेही न पाहतां शेवटपर्यंत लढेल. झाली ही व्यवस्था उत्तम आहे यांत आणखी मी काय सांगणार !

( इतक्यांत डंका पडतो )

**पृथ्वीराज**—हा पहा तयारीचा पहिला डंका झाला. आतां मलाही तयार झालें पाहिजे.

**संयो**—अगदीं झाली कां तयारी !

**पृथ्वी**—हो, प्रिये, घे तें इकडे कवच ! चढव पाहूं तें माझ्या अंगावर ! ( संयोगिता कवच घालूं लागते ) त्याची ती मुख्य कडी आडकीव म्हणजे तें अंगाला चांगलें बसेल.

**संयो**—( तिचा हात थरथर कांपतो ) वल्लभा, ती कडीच मला मुळीं सांपडत नाहीं.

**पृथ्वी**—सखे तुझा हात कांपतो कां ! जरा आजू बाजूला पहा म्हणजे सांपडेल. ( चाचपून ) ही पहा अडकव ती आतां ! आणं तें शिरस्त्राण ! माझा कंबरपट्टा कुठें आहे.

**संयो**—हा इथेंच आहे !

**पृथ्वी**—( कंबरपट्टा घालून ) या उजव्या बाजूला तमंचा, आणि खंजीर खोंचून, तिच्या जवळ गदा असूं दे ! ती माझी विजयी समशेर डाव्या बाजूला लटकाव ! हा बाणाचा भाता असा पाठीशीं बांध ! आण तें धनुष्य इकडे ! झालेंना आतां सर्व !

**संयो**—होय महाराज ! हा रामगुरू पुरोहितांनीं दिलेला मंत्र

आपण आपल्या जवळ ठेवावा; आणि प्रसाद म्हणून हा हार आपण गळ्यांत घालावा. ( हार त्याच्या गळ्यांत घालते ) ज्या हातांनीं आम्ही प्रियकांताच्या चरणाची नेहमीं सेवा करावी, त्यांच्या मनाप्रमाणें वागून त्यांना सदोदित आनंद आणि सुख होईल असें करावें, तें सर्व सोडून मी चांडाळीण आपल्या हातांनीं शस्त्रास्त्रें बांधून महाराजाना रणांत झुंजण्यास पाठवावें-ना ! देवा काय हा दुर्धर प्रसंग ! ( तिच्या डोळ्यांस पाणी येते ) महाराज हेंच कां हो सौख्य माझ्यापासून आपल्यास व्हावें. याचकरितां कां आपण माझा अंगि-कार केलात; आणि हें डोळ्यांनीं पहाण्याकरितांच कां मी दुर्दैवी अद्यापपर्यंत जगलें. मी जर जन्मलें नसतें तर काय जग माझ्यावांचून ओस पडलें असतें. पण तें होणार कोठून ! खरोखरच आम्ही भयंकर, आणि साहसी ! आपल्या जीवितावर संकट आणणारी खरो-खरच मी मूर्तिमंत कृत्या बरें कृत्या ! महाराज—
( तिचा कंठ दाटून येतो )

**पृथ्वी**—( तिला जवळ घेऊन ) प्रिये, उगीच तूं आपल्या मनाला याबद्दल वारंवार वाईट कां वाटून घेतेस? आपले पती रणमंडपांत जयश्री वरण्याकरितां आणि आपलें क्षत्रियकुल धन्य करण्याकरितां चालले असतां वीरांगना दुःख करीत नाहींत. त्यांना त्या उलट्या उत्साह देतात! तुम्हीं सर्व स्त्रियांनीं जर असें केलें तर आमच्या हातून काय पराक्रम होणार ! या वेळच्या तुझ्या दुःखित मुद्रेकडे मी पाहिलें कीं माझें धैर्य अगदीं गळून जातें.

मघाशीं तूंच मला धैर्य देत होतीस, आणि आतां तूंच धैर्य सोडतेस! तूं कांहीं काळजी करूं नकोस. जोंपर्यंत माझ्या हातांत हें धनुष्यबाण आणि ही तरवार धरवते आहे तोंपर्यंत त्या गोरीला मी यशप्राप्ति कधीं होऊन देणार नाहीं.

**संयो**—काय महाराज, माझ्या अशा करण्यानें आपला निरुत्साह होतो. तर हें मी आपलें दुःख आंवरलें. आपण माझा अंगिकार केल्यादिवसापासून आपल्यावर आपल्या प्रिय प्रजांजनांची अप्रीति झाली, आपल्याला जनापवाद ऐकावे लागले; रणप्रसंग उभा राहून आपल्याला माझ्या बाबाकडन नाहीं तीं दूषणेंहीं मिळालीं, इतक्या सर्व गोष्टी माझ्यामुळें झाल्या ? आणि आतां रणांगणांत क्षात्रतेज दाखवून, यशश्री, आणि अखंड कीर्ति वरण्याचा आपल्या सारख्या वीराला योग आला असतां त्याला मी अडथळा आणूं ! असा सवती मत्छर करून जगांत आणखी आपलें हांसें करून मी आपल्या पदरीं पाप कधीं बांधून घेणार नाहीं. माझ्यामुळें आपल्याला झाला तो त्रास पुष्कळ झाला. मरायचें हें केव्हां तरी आहेच असें जर आहे तर जगांत मागें कीर्ति ठेवून मरणें यापेक्षां उत्तम मरण दुसरें कोणचें ! ज्याची कीर्ति मागें अखंड गाजत आहे तो या लोकीं अमर होय; तर हें चव्हाण कुल मुगुटमणे, आपल्या यशाच्या आड मी कधींही येणार नाहीं. या लोकीं माझ्या दुर्दैवानें आपल्या चरणाची पुष्कळ सेवा करण्यास मला सांपडलें नाहीं. तरी मी स्वर्गीं येऊन आपली सेवा करीन. जेथें आपण तेथें ही आपली संयोगिता दासी आहेच.

पृथ्वी–संयोगिते, या तुझ्या भाषणानें कोणत्या वीराला वरें स्फुरण चढणार नाहीं. माझ्या ऐश्वर्याचें, माझ्या राज्याचें आणि माझ्या कुलाचें खरोखर भूषण तूंच ! चव्हाण कुलांत मोठमोठे वीर जन्मास आल्यानें जितकें तें कुल धन्य झालें, त्याच्यापेक्षां शतपटीनें ज्यास्त तुझ्यामुळें त्याला धन्यता आली. तुला एकच सांगतों कीं, जशी तूं वीर-कन्या आहेस, तशीच तुला सगळ्या जगानें वीरपत्नी म्हणावें असेंच कृत्य मी रणांत करून दाखवीन. आज-पर्यंत पृथ्वीराज हें नांव विषय छंदाच्या योगानें जसें सर्वतो मुखीं होतें, तसेंच आपल्या कुलाच्या विमल कार्तिकरितां, या माझ्या प्रजाजनाकरितां, माझ्या भरतभूमीकरितां, आणि माझ्या आर्यधर्माकरितां सम-रांगणांत शौर्य दाखवून, सगळ्यांच्या स्मरणांत तें रहावें असें करीन तरच चव्हाण कुलांत जन्मल्याची सार्थकता. जर ही गोष्ट माझ्या हातून झाली नाहीं तर हे वीरकन्ये मी आपलें अमंगळ तोंड तुला कधींही दाखविणार नाहीं. तुला शेवटची एक गोष्ट सांगतों त्याप्रमाणें कर म्हणजे झालें.

संयो–-काय आज्ञा आहे.

पृथ्वी—तुला रणांतील सर्व बातमी समजावी अशी मी तज-वीज केली आहे, तुझ्या सहायाकरितां मी जयदेव सिंगास ठेविलें आहे, शहराचे सर्व दरवाजे बंद करून नीट बंदोबस्तानें रहा; आणि शहराचें नीट रीतीनें रक्षण कर. वाड्यांत पृथाताई किशनकुवर, वगैरे सर्व राज-स्त्रिया आहेत त्यांना संभाळ, जर मी यशस्वी होऊन आलों तर ठीकच आहे, कदाचित भलताच प्रसंग आला

आणि शत्रूनें शहर काबीज करून राजवाड्यावर हल्ला केला तर मग कसलीही शंका मनांत न आणतां वीरांगनेला योग्य, आपल्या कुलाला उचित, रजपूत स्त्रियांना भूषण आणि आपल्या कीर्तीला डाग न लागेल असें कर म्हणजे झालें. कारण तो यवन कोणतेंही अघोर कर्म करायला चुकणार नाहीं? तूं सूज्ञ आहेस, तुला जास्त सांगणें नको.

**संयो**—आपल्या आज्ञेप्रमाणें सर्व करीन! आमचें नख देखील शत्रूच्या दृष्टीस पडणार नाहीं. परमेश्वर आपलीं सर्व संकटें टाळून आपल्याला विजयी करो.

( नगारा, भेरी वगैरे रणवाद्यें वाजूं लागतात. )

**पृथ्वी**—हीं पहा रणवाद्यें वाजूं लागलीं. मला आतां गेलेंच पाहिजे. सर्वजण माझी वाट पहात असतील. प्रिये, एकदां मला शेवटचें प्रेमालिंगन दे.

**संयो**—महाराज, शेवटचें असें कां बरें म्हणावें. आपण परत येईपर्यंत नुसत्या आपल्या चरणतीर्थावर जीव ठेवून निकराची वेळ येईपर्यंत दिल्ली शहराचें रक्षण करीन. आपल्या पाठीमागें मग एक क्षणभर देखील ही संयोगिता राहणार नाहीं.

**पृथ्वी**—जगत्चालका, हें अगोदर सुख मला तूं जन्म जन्मांतरीं मिळूं दे. तुझी पूर्ण कृपा आपल्याशिवाय हें सुंदर रत्न मला अभाग्याला कशानें लाभणार. हे सूर्यनारायण, हे सर्व देवतांनो. हे कुलस्वामिनी, ही माझी गृहदेवता आतां मी तुमच्या सर्वांच्या स्वाधीन करतों. हिचें नीट रक्षण करा. कदाचित् वेळ प्रसंगीं प्रिये तुझे

तूंच रक्षण केलें पाहिजेस. या लोकीं जरी आपल्या परस्परांच्या देहाची दुर्दैवानें ताटातूट केली, तरी स्वर्गलोकीं ती त्याच्यानें कधींही करवणार नाहीं. ही प्रेममिठी सोडून जाण्यास माझें पाऊल उचलत नाहीं, पण काय करावें आपापल्या धर्माप्रमाणें चाललेंच पाहिजे. संयोगिते, दैव करील तर तुझी आणि माझी कीर्ति या भरतखंडांतील सर्व अबालवृद्धांच्या तोंडीं सदोदित राहील असेंच होईल. येतों--बरें--मीं--( तिचें चुंबन घेऊन जातो. )

**संयो**--( गहिंवरते आणि पृथ्वीराजाकडे पहात निश्चल रहाते. ) रूपावती गेले ग गेले ? ते पहा महाराज आपल्या सैन्याला जाऊन मिळाले. पुन्हा तें सुंदर मुख मला केव्हां पहायला मिळेल, आणि ते गोड शब्द मी केव्हां ऐकेन. आई जगदंबे, माझ्या प्रियकराला यशस्वी करून परत आण, आणि माझा सौख्याचा ठेवा मला पुन्हा लौकर मिळूं दे.

( डोळे पुशीत जाते. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थळ**—कागर नदीच्या कांठचें रणमैदान.

**पात्रें**--पृथ्वीराज, समरसिंह, कन्हराय, चामुंडराय, वगैरे सरदार आपापल्या सैन्यासह उभे आहेत.

**पृथ्वी**—( पुढें होऊन मोठ्या आवेशानें ) समरसिंह, कन्हराय, चामुंडराय वगैरे वीर आणि सर्व सैनिक हो, आजपर्यंत माझ्या हातून तुमचें कोणत्या प्रकारें रक्षण झालें, आणि

मी तुम्हा सर्वांशीं कसा वागलों, हें तुमच्या सर्वांच्या स्मरणांत आहे. माझें ऐश्वर्य, माझें राज्य, आणि माझा अधिकार हें सर्व तुमचें. तुमच्यामुळें माझी प्रतिष्ठा, आणि तुमच्या सर्वांच्या बळावर माझें शौर्य ! तुम्ही आपलें शौर्य रणांत दाखवून पुष्कळ वेळ विजय संपादन केला आहेत; तेव्हां आजचा हा रणसंग्राम तुम्हाला नवीन नाहीं. आपला धर्म, आपलें कुलशील, आणि आपला अभिमान सर्व विसरून जाऊन केवळ वैराग्नीच्या धुरानें अंध होऊन हा नीच जयचंद आपल्या यवन शत्रूला मिळून कित्येक धर्मद्रोही हिंदुराजांना बरोबर घेऊन, आर्यधर्म बुडविण्याला, भरतखंड दुसऱ्याच्या ताब्यांत देण्याला, आणि सर्व क्षत्रिय वीरांची अपकीर्ति करून घेण्याला कारण होत आहे; तेव्हां या अभिमानशून्य मदांधाच्या डोळ्यांत अंजन घालण्याकरितां तयार व्हा, आणि आमचें क्षत्रिय शौर्य आणि आमचा स्वाभिमान अद्याप जागृत आहे असें दाखवा. आपल्या राज्यलक्ष्मीचा अभिलाष धरून, तिला आपली दासी बनवून परशत्रू तिची हवीतशी विटंबना करीत असतां, कोणता क्षत्रिय वीर तो निमूटपणें पाहील ? कोणत्या रजपूत वीराच्या डोळ्यांतून क्रोधाग्नीच्या ज्वाला बाहेर पडून तो आपल्या शत्रूची त्यांत आहुति देणार नाहीं. आपल्या धर्माची, आपल्या भरतभूमीची दुसऱ्याच्या हातानें छळणूक होत असतां ती जर आपण स्वस्थपणें पहात बसलों, तर ज्या आपल्या स्वर्गस्थ पूर्वजांनीं आपल्या देशाकरितां, आणि आपल्या धर्माकरितां आपल्या देहाचे

बळी दिले; ते आपले परमपूज्य पूर्वज आपल्या शौर्य-शून्यत्त्वाबद्दल खालीं माना घालून दुःखाश्रू गाळतील. ही आपली आर्यजननी, तिच्या कित्येक कुपुत्रांनीं तिच्याशीं आणि आपल्या धर्माशीं कृतघ्नपणा केल्याबद्दल ढळढळा रडत आहे, तर तुम्ही तिचें आपल्या सत्कृत्यानें शांतवन करा. तुमच्या अंगांत आपल्या पूर्वजाचें प्रखर तेज वसत आहे, तर त्याची सत्यता सर्वांच्या प्रत्ययास आणून आपल्या पूर्वजाकडून त्यांचे वंशज कुलदीपक आहेत असें म्हणवा, आणि आपल्या जन्माची सार्थकता करून दाखवा. आपल्या स्वराज्याकरितां, आपल्या हिंदुधर्माकरितां, आणि जी भरतभूमी तुमच्या सारख्या वीरांना प्रसवून आपल्यास धन्य म्हणवीत आहे तिच्या करितां, एक दिलानें रणांत लढून आपल्या प्रतापरवीनें सर्वांना दीपवून टाका, आणि विजयश्री संपादन करून आपली कीर्ती अजरामर करून ठेवा, कीं जेणें करून तुमचे धन्यवाद सर्व जग मोठ्या प्रेमानें गाईल. रजपूत वीरांना आपल्या कुलाची कीर्ति वाढविणें या सारखें दुसरें भूषण काय आहे. कीर्तीवांचून जो मनुष्य जगांत राहतो, तो जिंवत असून मेल्याप्रमाणेंच ! वीरहो, तो पहा दुष्ट ज्याला तुम्ही सात वेळ नाक घांसायला लाविलें होतें तो गर्वानें फुगलेला, तुमच्या राजद्रोही, आणि धर्मद्रोही बंधूंना बरोबर घेऊन मोठ्या डौलानें रणवाद्यें वाजवीत येत आहे, तर वीरसिंहांनो, पहातां काय, त्या मदांध यवनकुंजराचें गंडस्थळ, तुमच्या तीक्ष्ण शस्त्रनखाग्रांनीं फोडून त्याला आपल्या देशांतून पार हांकून लावा.

**चामुंड**—कुठें आहे तो यवन, महाराज द्या आम्हाला आज्ञा, त्याच्या नरडीचा आतां घोट घेतो.

**सैनि**—विजयश्री संपादन केल्याशिवाय आम्ही एक पाऊलही मागें हटणार नाहीं.

**कन्ह**—पुन्हा तो भरतखंडांत येईल कीं नाहीं असें त्याला करून लावतों.

**पृथ्वी**—शाबास वीर हो शाबास! रावळ, तुम्ही उजव्या बाजूनें जाऊन त्याच्यावर हल्ला करा. चामुंडराय तुम्ही येथेंच राहून त्याच्यावर मारा करा. कन्हराय आणि मी दोघे मिळून त्याच्याशीं सामना करतों. आर्यजननीकी जय, कीर्तिदेवीकी जय, विजयश्रीकी जय!

( सर्व जातात. )

( इतक्यांत तातारखा आणि कहरकंठीर येतात. )

**कहर**—तातारखा साब, पेहले वो कन्हरायकु उडाव, ए बाजूकी कत्तल करो, और आगे बढो, जलदी करो. मे इनकी खबर लेताहूं.

**तातार**—ज्याव, जहा पन्हाकु जाके खबर देनाके आपने आज फत्ते है.

( घाईघाईनें चामुंडराय येतो )

**चामुंड**—अरेरे काय, ही विपरीत वेळ आली! तो तिकडें काय गोंधळ उडाला पहा? आमचे कन्हराय सेनापती पडले, लोक कचर खाऊं लागले. ( मोठ्यानें ) वीरहो मागें पाऊल घेऊं नका. संभाळा—रणांत मेलांत तरी हरकत नाहीं, पण आपली आर्यभूमी यवनांच्या ताब्यांत देऊं नका. तुम्ही पळालांत तर तुमच्या रजपूत शूर

कुलाला कलंक लागेल, तुमची अपकीर्ती होईल, सर्व-जन आणि तुमच्या स्त्रिया सुद्धां तुमची अप्रतिष्ठा कर-तील. पहातां काय, चला पुढें व्हा. धीर धरा. कापा, मारा, मुसलमानांचा शिरच्छेद करा.

( ओरडत निघून जातो )

( पृथ्वीराज येतो. )

पृथ्वी—( दुःखानें ) जो मी आजपर्यंत आवाजावरोवर बाण मारून भेद करीत असे, ज्याचें निशाण कधींही चुकलें नाहीं, त्या पृथ्वीराजाचा गोरीवर टाकलेला बाण, तो अगदीं जवळ असून त्याला न लागतां फुकट जावा, तेव्हां हेंच खरें कीं,—

दोहरा.

" दिन पलट्यो पलटी घडी, पलटी हथ्थक बान ॥
पिथल एहीज पारखुं, दिन पलट्यो चहु आण " ॥ १ ॥

हे अभाग्या चव्हाणा, तुझा दिवस फिरला, घडी बद-लली, आणि म्हणून हातांतील बाणही निःसत्व झाला. जरी या वेळीं माझें धनुष्य निरुपयोगी झालें तरी ही माझी असिलता, शत्रूचें कंदन करण्यास तयार आहे. ( मोठ्यानें ) वीरांनो या धर्मभ्रष्ट कापराना मागें हटवा. आणि आपल्या शौर्याची शर्थ करा, चला—पुढें—सरा.

( इतक्यांत पुनः तातारखा येतो )

तातार—ए, ए, पृथ्वीराज, पकडो, पकडो, अब किधर भाग जायगा !

कहर—हां हुजूर ए, चोर पृथ्वीराज है. पकडो.

( पृथ्वीराजाची त्यांची चकमक होते पृथ्वीराजाच्या हातची तरवार गळून पडते, दोघे त्यांस पकडतात. )

**पृथ्वी**—हाय, हाय, ऐन प्रसंगीं माझ्या तरवारीनें पहा मला कसा दगा दिला तो ? माझें नशिब पुरें फिरलें हेंच खचित. जीं मला दुःस्वप्नें आणि दुःचिन्हें झालीं, त्याचा आतां प्रत्यय आला. ( तातारखांकडे पाहून ) हे शूर पुरुषा, तुझ्या महंमद गोरीला सात वेळ मी पकडला असतां, सोडून दिला आहे; आज तुझ्या हातीं मी प्रथमच लागलों आहे तेव्हां तूं मला सोडून दे. त्यांतून मी निःशस्त्र आहे, तुला माझ्याशीं लढायचें असेल तर माझ्या हातांत शस्त्र दे आणि मग तुझें माझे दोन हात होऊंदे.

**तातारखा**—अबे कंबख्त, पृथ्वीराजा सारिका दुःस्मन हातमे लगट हुवा, उसकु छोड देना मेसिका नही हुं. आपने दुस्मानकु चहाय उस तरेसे कोई शकलसे पकडना, उसकी गर्दन न काटना, और उसकु दुनियेमेसे पार कर देना हो हम जानते और कुच जानते नहि. हातमे लगा हुवा पृथ्वीराज उसकु छोड दना, और उसके हातमे समसेर देना, फिर पिछे उससे लढना, ऐमा दिवाना ए तातारखां नहि है. एक दफे नहि, दो दफे नहि सात दफे आपना दुस्मन कबजे मे आया, उसकु जानसे छोड देने वाला, बे अक्कली आदमी जो दुनियामे कुई होगा दिवाना पृथ्वीराज एकही है. और दुसरा कुई मेरे नजर मे नहि आता. अबे बदमास, तूं जो पहेले वख्त आपने दुस्मनकु मार डालता, तो अबी तेरे उपर ऐसा बुरा वख्त कभी न आता.

पृथ्वी—खरें, अगदीं अक्षरशः तुझें म्हणणें खरें आहे. पहिल्याच वेळीं जर मी घोरीचा शिरच्छेद केला असता, तर आज आजचा हा दुर्धर प्रसंग माझ्यावर आणि माझ्या देशावर कधींही आला नसतां. वेळ गेल्यावर पश्चात् बुद्धि काय उपयोगी.

( इतक्यांत महंमद घोरी हातांत तरवार घेऊन येतो. )

महंमदगोरी—किदर, किदर है. मेरा दुस्मन पृथ्वीराज, बतलाव जलदी बतलाव. उस कंबख्तकामे खून पी जाऊं.

तातार—जहा पन्हाका तकदीर बडा है. ए देखो पृथ्वीराज आपने हातमे लगा है.

महं—( पृथ्वी राजाकडे पाहून ) अबे हरामखोर, तुमने मेरे पावमे बिडी डालकर मुजे कैदमे रखाथा. और दिल्लीमे घरघर गुमायाथा, उसका नत्तिजा अबी देखले. उस-दिल्लीके दरवाजेपर तेरा शीर लटकाउंगा और सब दिल्ली जलाकर खाक कर डालुंगा.

पृथ्वी—तुझ्या साख्या नीच, घातक्यावर उपकार करणें म्हणजे आपल्या नाशाचें बीजारोपणच करणें होय. तुला योग्य शासनच पाहिजे. ज्या जिभेनें हे शब्द उच्चारलेस तीच आतां ओढून काढतों. तुझ्या दुष्ट कृत्याबद्दल हें घे तुला बक्षिस—( त्याला लाथ मारतो, गोरी त्याला वार करतो. तो मुर्च्छित होऊन पडतो. )

महं—नहि, नहि अबीतक तेरा कुर्रा गया नहि. अबे हरामखोर अब तेरी तेडी जबान, तेडी घुमा कहां है ! बोल बोल ( त्याला आणखी वार करतो ) चलो तातारखा, शहर काबीज करो. जा कुई सामने आवे उसकी कत्तल कर-

डालो. पृथ्वीराज गया अब सब मैदान खुला है. सब हिंदुके मुंता करो, कत्तल करो, लुटो, चलो बोलो दीन–दीन–दीन–दीन–

( सर्वजण ओरडत निघून जातात. )

**पृथ्वी**—( दुःखानें ) हे आर्यभूमी माते, तुला देखील आमचा कंटाळा आला काय ! आतां तुझी दशा काय होईल. हे चांडाळ धर्मभ्रष्ट काफर, तुझी नाना तऱ्हेनें विटंबना करतील, तुझ्या लेंकरांचा अतोनात छळ करतील, या दुःखानें माझ्या हृदयाचे शतशः तुकडे तुकडे होत आहेत. हे आर्यवसुंधरे, या नीच परधर्मी परकीय गिधाडाची खोड मोडणारा असा एखादा तरी वीर आर्यपुत्र जगलाच नाहीं काय ? छे, छे, तुझ्या पोटीं अभिमान शून्यत्वाचे पुतळे, तुझ्याविषयीं अनास्था दाखविणारे, आपल्या राष्ट्राशीं आणि आपल्या धर्माशी द्रोह करणारे, कुलांगार, कृतघ्न, नीच असे नराधम उत्पन्न झाले म्हणून परधर्मी शत्रूच्या हातून तुझी छळणा होते. हे भरतभूमिके. पडली पडली, बरें तुझ्या पायांत परवशतेची जबर शृंखळा पडली. आतां ती लौकर निघणें कठीण, आर्यधर्म, हिंदुराष्ट्र पार रसातळाला बुडालें. जोपर्यंत तुझी दुःसहस्थिति पाहून कळवळणारे शूरवीर तुझ्या दास्यबंधमोचनाकरितां जन्माला येणार नाहींत, तोंपर्यंत या परतंत्र पाश बंधांत राहून तुला परक्या पढेंच मान खालीं घालून दुःखाश्रू गाळीत दुःसह दुःख सोसलें पाहिजे. तुला बंधमुक्त करणारे शौर्यनिधी आर्यपुत्र फार दिवसपर्यंत जरी जन्मले नाहींत तरी

एकटे गांठून जेतसिंग सरदारानें त्यांच्यावर वार केला. त्याबरोबर ते मूर्च्छित पडले; तों जलालखा सरदारानें एकदम येऊन घात केला.

**पृथा**—देवा—देवा—झालें आतां ऐकायचें काय उरलें. बाई, संयोगिते—आटोपला माझा या लोकचा सर्व कारभार !

( इतक्यांत दुसरा शिपाई धांवत धांवत येतो. )

**शिपाई**—बाई साहेब, रूपावती, उठा, उठा, पळा आपलें रक्षण करा. बुडालें आपलें राष्ट्र ठार बुडालें. महाराजांचा रणांत घात झाला. मुसलमानांची फत्ते झाली. शहाबुद्दी गोरी आपल्या विजयी सैन्यासह दिल्लीशहर जाळीत पोळीत उध्वस्त करीत आहे. जयदेवसिंगाला आणि त्याच्या सर्व लोकांना त्यानें कापून टाकलें आपल्या अब्रूचें रक्षण करा.

**संयो**—आकाशच कोंसळल्यावर तेथें कोणाचा उपाय चालणार. रूपावती जा वाड्याच्या चारी बाजूला आग लावून दे. वल्लभा, तुमच्यावर शेवटीं असा प्रसंग गुदरलाना ! त्या दुष्ट स्वप्नाचा हा परिणाम बरें ! हे कुलस्वामिनी तूं आमच्यावर अशी कां कोपलीस !

**शिपाई**—बाई साहेब, ही दुःख करण्याची वेळ नव्हे. चला, चला. कांहीं तरी आत्मरक्षणाचा उपाय लवकर काढा.

**संयो**—होय बाबा, ही दुःख करण्याची वेळ नव्हे. घाबरूं नकोस. त्या मदांधांना रजपूत स्त्रियांतहि किती शौर्य आहे हें दिसेल. हे चव्हाण कुलदीपका वीर श्रेष्टा, आपल्य क्षत्रिय धर्माप्रमाणें, आपल्या राष्ट्राकरितां, आणि या संयोगितेकरितां रणांगणांत देह ठेवून तुम्ही

आपली कीर्ति अचल करून ठेवलीत. तुमच्या आज्ञे-प्रमाणें ही मी आपल्याकडे आलेंना !

( पड्यांत, मारा, पकडा, फोडा दरवाजे राजवाडा हस्तांगत करा, असा ओरडत राजा जयचंद येतो. )

( मधील चौकांत चिता पेटली आहे सर्व राजस्त्रिया तिच्या जवळ सशस्त्र उभ्या आहेत असा प्रवेश होतो. )

**शिपाई**—बाई साहेब, ही पहा शत्रु पक्षाला मिळालेल्या सेना राजवाड्याचा दुसरा दरवाजा फोडून आंत येत आहे. ( सैन्याकडे पाहून ) वाहवा. काय नामी गोष्ट झाली. हे आपले जयचंद महाराजच आपल्या सहायाकरितां आले.

**संयो**—कोण बाबा, आमच्या सहाय्याकरितां आले. कदाचित् पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवेल पण त्यांच्या तोंडांतून एकदां निघालेलीं वाक्यें खोटीं होणार नाहींत. बाबा—

**जय**—संयोगिते, हा तुझा पिता आपली प्रतिज्ञा शेवटास नेऊन जगांत विजयी झाला.

**संयो**—( संतापानें लाल होऊन ) द्वेषाग्नीच्या धुरानें अंध होऊन, परक्या शत्रूला आपल्या घरांत घालून, मोठ-मोठीं क्षत्रियकुलें बुडविणारा, हिंदूराष्ट्राचा आणि आर्य-धर्माची राखरांगोळी करणारा, भरतभूमीचें सौभाग्य नाहींसे करून, तिची दुसऱ्याकडून विटंबना करविणार, या सर्व रजपूत स्त्रियांच्या सौभाग्य मंदिराला आपल्या हातानें अग्नि लावून, त्याच्या या लोकच्या सौख्यांत माती कालविणारा, आणि प्रत्यक्ष आपल्या पोटच्या कन्येस आपण वैधव्य देणारा आणि आपली दुष्ट प्रतिज्ञा

शेवटास गेली म्हणून आनंद मानणारा जर पाषाण हृदयी—प्राणी आणि पिता या जगांत कोण असेल, तर ते बाबा आपणच ? क्रोधावश होऊन अविचारानें आपलें, आणि दुसऱ्याचें सर्वस्वी नुकसान करून अखंड आपली अपकीर्ति मागें ठेवून, धर्मद्रोही होऊन नरका-शिवाय तुम्ही दुसरें काय साधन करून ठेवलेंत ! ज्यांनीं आपल्या पराक्रमानें आपल्या प्रियजनांचे दुःखपाश तोडून टाकले; ज्यांनीं आपल्या सत्कृत्यांनीं सर्वांचीं अंतःकरणें प्रेमानें भरवून, त्यांच्या हृदयांत आपल्या-करितां पूज्यस्थान करून ठेवलें, ज्यांनीं केवळ लोकांच्या कल्याणाकरितां, प्रसंगीं देह देखील खर्ची घातले, आपल्या जननींना वीरमाता म्हणविल्या; तेच खरे वीर, तेच खरे आर्यपुत्र, आणि तेच या लोकीं धन्य ! महा-राज रणांत लढून स्वर्गलोकचें सौख्य भोगण्यास गेले आणि आम्ही ही आतां त्यांच्याच भेटीला जाणार. बाबा कशाला या कुलटेचे तोंड पहायला आलांत ! ज्यांना मी पहिल्यापासून मनानें वरिलें, ज्या आम्हां दोघांचे देह मात्र निराळे, बाकी अंतरात्मा एक. तो माझा प्राण समरांगणांतून यशोदुंदुभी वाजवीत वर गेला असता मी जर मागें राहिलें, तर मात्र जन मला कुलटा म्हणतील. समरभूमींत रजपूत वीर पतन पावले असतां, त्यांच्या बरोबर सहगमन करणाऱ्या वीरांगना खरोखर कुलभूषणच होत.

जयचंद—पोरी—

( इतक्यांत दीन दीन करीत तातारखा, जलालखा येतात. )

